श्री मालिक राम हे उर्दू साहित्यजगतातील एक सुपरिचित नाव आहे. ते एक अग्रगण्य टीकाकार व उर्दू भाषाकोविद आहेत. श्री मालिक राम यांचा जन्म पश्चिम पाकिस्तानातील फालिया येथे झाला. प्रारंभी त्यांनी पत्रकार म्हणून काम केले. त्यानंतर ते इंडियन फॉरेन सर्व्हिसमध्ये शिरले. तीत त्यांना पश्चिम आशिया व युरोपात मुक्तपणे प्रवास करण्याची संधी मिळाली. सरकारी नोकरीतून सेवानिवृत्त झाल्यानंतर ते तीन वर्षे साहित्य अकादमीचे उर्दूविभाग-प्रमुख होते. 'जिक्र-ई-गालिब' व 'तालामाझा-ई-गालिब' ही त्यांची प्रकाशने असून, त्यांनी अनेक महत्त्वपूर्ण ग्रंथांचे संपादनही केलेले आहे. त्यांत 'दीवान-ई-गालिब' – उर्दू व फारशी असे दोन्ही – आणि मौलाना अबुल कलाम आझादकृत 'गुबर-ई-खातिर' व 'तझकिराह' यांचा समावेश होतो. मालिक राम ही आज कवी गालिबवरील सर्वश्रेष्ठ अधिकारी व्यक्ती म्हणता येईल.

# दोन शब्द

या देशाच्या सीमा ओलांडून बऱ्याच प्रमाणात कीर्ती संपादन करणारा गालिब हा बहुधा एकमेव उर्दू कवी होय. त्याला त्याच्या जिवंतपणीच पुरेशी मान्यता मिळालेली होती. परंतु तिचे क्षेत्र किंवा आपले स्वतःचे नशीब या दोहोंबद्दल त्याला समाधान वाटले नाही. साहित्य-क्षेत्रातील आपल्या श्रेष्ठतेबद्दल त्याला पुरेपूर जाणीव होती व इतिहासाचा अंतिम कौल काय राहील याबद्दल त्याला कधीही संदेह वाटला नाही. त्यामुळेच, आपल्या मृत्यूनंतर लोक आपल्या काव्याचा उच्च दर्जा वाखाणतील व अशा प्रकारे आपले भाग्य-नक्षत्र उदयास येईल, असे भाकीत त्याने केले होते. फेब्रुवारी १९६९ मध्ये त्याची मृत्यु-शताब्दी आंतर्राष्ट्रीय प्रमाणावर साजरी केली गेली या वस्तुस्थितीवरून त्याचे हे भाकित किती विलक्षण रीतीने खरे ठरले हे उघड आहे.

त्याचे नाव आपल्या 'राष्ट्रीय चरित्र-मालेत' समाविष्ट करण्याचे नॅशनल बुक ट्रस्टने ठरविले व या कवीचे संक्षिप्त चरित्र लिहून त्याच्या काव्याचे रसग्रहण करण्यास श्री मालिक राम यांस विनंती केली. हा चिमुकला ग्रंथ हे त्याचेच फळ होय.

काव्य हे मूलतः अनुवादनीय नसते. प्रत्येक भाषेला तिची स्वतःची प्रकृती व आगळे वैशिष्ट्य असते व तिच्या गरजेनुरूप तिच्या शब्दसंहतीचा विकास होत असतो. उर्दू याला अपवाद नाही. शिवाय 'गजल' ही मूलतः पौर्वात्य मनाची निर्मिती होय. पाश्चात्त्य साहित्यात कोणताही तत्सम प्रकार आढळत नाही. स्वाभाविकपणेच त्याच्या पार्श्वभूमीशी परिचित असल्याशिवाय व त्याच्या वातावरणाचे शिक्षण व संस्कार झाल्याशिवाय त्याचे रसग्रहण करणे व त्याचा आस्वाद घेणे शक्य होत नाही. गालिबच्या शेरांची निवड करून त्यांचा अनुवाद करणे त्यामुळेच सोपे काम नव्हते. दुसऱ्या प्रकरणात गालिबचे २०० वर प्रातिनिधिक शेर समाविष्ट करण्यात आले आहेत; ते त्याच्या उर्दू 'दीवाणा'च्या—कवितासंग्रहाच्या—दहा टक्क्यांपेक्षा अधिक आहेत. इंग्रजी

जाणणाऱ्या वाचकाला ते या कवीची ओळख करून देतील व त्याच्या प्रतिभेची चुणूक दाखवतील, तसेच त्याच्या मनोवैभवाचा व सुसंस्कृततेचाही परिचय करून देतील अशी मी मनःपूर्वक आशा करतो.

आमच्यासाठी हा ग्रंथ लिहिण्याची जबाबदारी स्वीकारल्याबद्दल नॅशनल बुक ट्रस्ट श्री मालिक राम यांचा आभारी आहे. उर्दू शेरांच्या इंग्रजी अनुवादासंबंधी मौल्यवान सूचना केल्याबद्दल ब्रिगेडियर आर. आय. एन. लूथा यांचेही आम्ही कृतज्ञ आहोत.

बाळकृष्ण केसकर

# अनुक्रमणिका

## १

### प्रस्तावना

उत्तर भारताच्या बव्हंश भागावर इब्राहिम लोदी राज्य करीत असता काबूलचा राजा बाबर याने भारतावर आक्रमण केले. इब्राहिमच्या दरबारातील काही असंतुष्ट व्यक्तींनी त्यांच्या मदतीला येऊन लोदी राजवंशाच्या या अखेरच्या बादशहाला उलथून पाडण्यासाठी बाबरला बोलावले. भारताच्या या संपन्न व सुपीक खोऱ्यावर बाबरचा आधीपासूनच डोळा होता व आपल्या खडकाळ व दुर्गम गिरिप्रदेशातील राजधानीहून खाली येण्यासाठी तो अनुकूल संधीची वाट पाहात होता. हे मनाजोगे आमंत्रण जेव्हा त्याला मिळाले तेव्हा त्याने त्याचा तत्परतेने स्वीकार केला व आपले मूठभर योद्धे घेऊन त्याने भारताची सीमा ओलांडली. २१ मार्च १५२६ रोजी पानिपत येथे इब्राहिम लोदीशी त्याच्या सैन्याची निर्णायक लढाई झाली. इब्राहिम लोदीच्या सैन्याचा धुव्वा उडाला व तो स्वतः रणांगणावर मारला गेला. अशा प्रकारे त्या दिवशी पानिपत येथे भारतातील मोंगल साम्राज्याची मुहूर्तमेढ रोवली गेली.

पानिपत येथील विजय निर्णायक असला तरी त्याला संपूर्ण भारतावरील विजय म्हणता येणार नाही. बाबर यानंतर सुमारे चार वर्षेच जगला. त्याचा बहुतेक वेळ लहानलहान संस्थानांच्या व राज्यांच्या राज्यकर्त्यांशी लढण्यात गेला. १५३० साली तो वारल्यावर जेव्हा त्याचा थोरला मुलगा हुमायून गादीवर आला, तेव्हा हे नव-स्थापित साम्राज्य अजूनही सुरक्षित व स्थिर नव्हते. परिस्थिती त्याच्याविरुद्ध उलटली व परिणामी त्याला देशत्याग करून इराणला पळून जावे लागले. त्याच्या गैरहजेरीत शेरशहा सुरीने नवीन राजवंशाची स्थापना केली. ती त्याच्या वारसदारांच्या दुबळेपणामुळे व अयोग्यतेमुळे अल्पकालीन ठरली. या दरम्यान आपले गमावलेले राज्य परत मिळवण्यासाठी लष्करी साह्य देण्याबद्दल इराणच्या शहाचे मन वळवण्यात

हुमायूनला यश मिळाले. आपल्या इराणी फौजेनिशी हुमायून १५५५ मध्ये चालून आला. शेरशहा सुरीनंतर १५४५ मध्ये गादीवर आलेल्या त्याच्या मुलाचा – सलीम शहाचा – त्याने दणदणीत पराभव केल्यानंतर भारताचे तख्त हुमायूनला पुन्हा प्राप्त करून घेता आले. यावेळी हा विजय चिरकालीन ठरला. मोंगलांची राजवट या देशात पुढील ३०० वर्षे निर्व्यत्यय चालू राहिली.

हुमायूननंतर त्याचा मुलगा थोर अकबर १५५६ साली गादीवर आला. इंग्लंडची राणी पहिली एलिझाबेथ हिचा तो समकालीन होता. दोघेही अत्यंत यशस्वी राज्यकर्ते ठरले व दोघांनीही चिरकालीन कामगिरी बजावण्याचे श्रेय संपादन केले. अकबराची अर्ध-शतक राजवट हा भारतीय इतिहासातील एक अत्यंत उज्ज्वल कालखंड आहे. देशाची जीवनाच्या सर्व क्षेत्रांत प्रगती झाली. देशात शांतता व समृद्धी आणि विदेशांत लोकप्रियता व प्रतिष्ठा ही नित्याची गोष्ट होऊन बसली होती. आग्रा येथील शाही-दरबार हे इराण व पश्चिम आशियातील नशीब काढायला निघालेल्या सर्व लोकांचे, विद्वानांचे व साहित्यिकांचे, शिपायांचे व मुत्सद्द्यांचे मक्का बनले व लवकरच त्याची ख्याती युरोपपावेतो पसरली. नवागतांचा अशा प्रकारे अखंड प्रवाह सुरू झाला व त्याने भारतीय समाजाच्या राजसंस्थेत तद्वतच सांस्कृतिक जडणघडणीत ताजे रक्त मिसळून विकासाची गती कायम राखली.

अकबरानंतर साम्राज्याची भौतिक संपन्नता पुढील तीन पिढ्यांपर्यंत अव्याहतपणे कायम राहिली. तथापि, त्याच्या दुर्बलतेची चिन्हे बरीच पूर्वी, म्हणजे वस्तुतः अकबराच्या मृत्यूनंतर, त्याच्या मुलाच्या – जहांगीरच्या – काळातच दिसू लागली होती. औरंगजेबाच्या काळात हे दुखणे विकोपास गेले. जहांगीर, शहाजहान, किंवा औरंगजेब यांना कोणत्याही फार मोठ्या लष्करी कामगिरीचे श्रेय देता येणार नाही. वस्तुतः औरंगजेबाच्या कारकीर्दीत आपणांस शाही सत्तेचा इतका ऱ्हास झालेला दिसून येतो की त्या बादशहाला आपल्या आयुष्याची अखेरची वीस वर्षे दख्खनच्या रणांगणांवरच काढावी लागली. तेथून त्याला कधीच परतता आले नाही व १७०७ च्या फेब्रुवारीत त्याचा अहमदनगर येथेच अंत झाला. १८५७ साली अखेरचा मोंगल

बादशहा दुसरा बहादुरशहा याला इंग्रजांनी पदच्युत करून रंगूनला कैदी म्हणून पाठवले, तोपर्यंतची पुढील दीडशे वर्षे शाही घराण्याच्या ऐश्वर्याचा सतत ऱ्हास होत गेला. या देशातील मोंगल सत्तेला पहिला जबरदस्त तडाखा इराणचा बादशहा नादिरशहाने दिला. त्याने १७३९ मध्ये भारतावर स्वारी केली व शत्रुसैन्याचा पराभव केल्यानंतर राजधानीचा कबजा घेऊन तिला उद्ध्वस्त केले. या तडाख्यातून देश सावरतो न सावरतो तोच १७६१ मध्ये अहमदशहा अब्दाली आपल्या फौजांच्या झुंडींसह चालून आला व त्याने आपल्या पूर्ववर्तीयाची पुनरावृत्ती केली. त्यानंतर मोंगल राजघराणे जरी जवळजवळ पुढील शतकभर चालू राहिले, तरी शाही सत्ता हळूहळू ऱ्हास पावत गेली व शेवटी नुसत्या दिल्लीपुरतीच मर्यादित राहिली. हळू हळू समाजाच्या दूरवर पसरलेल्या प्रांतांनी स्थानिक पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखाली एकामागोमाग एक आपले स्वातंत्र्य जाहीर केले. खुद्द बादशहानेच राज्यपाल किंवा सेनापती म्हणून त्यांना तेथे वेळोवेळी पाठवले होते.

## घराणे

मोंगल राजदरबार आपल्या उत्तर काळात कोणत्याही परदेशी माणसाला कोणतीही आकर्षक चाकरी, मानाचे स्थान अथवा संरक्षण देऊ करण्याच्या स्थितीत नव्हता. परिणामी, या नशीब काढणाऱ्यांची रीघ बरीच कमी होत होत शेवटी त्यांची संख्या केवळ नाममात्र उरली. अवनतीच्या या काळात, सर्वांत अधिक मोबदला देणाऱ्यासाठी आपल्या तलवारी व चाकऱ्या गहाण टाकण्यास सदैव तत्पर असलेले केवळ बाजारू वृत्तीचे काही लोक आपणांस आढळतात. असा एक धनार्थी सैनिक होता कूकन बेग खान नावाचा एक तुर्क. तो अठराव्या शतकाच्या मध्यात समरकंदहून भारतात येऊन पोचला. असे दिसते की तो पूर्वी वैभवाचे दिवस पाहिलेल्या प्रतिष्ठित कुळातला होता व त्याचे नातेसंबंधही चांगले होते. तो प्रथम पंजाबचा राज्यपाल मोईन-उल-मुल्क याच्या पदरी राहिला. लाहोर येथे अल्पकाळ राहिल्यानंतर तो दिल्लीला आला व झुल्फकार-उद्-दौला मिर्झा नझफ खान याचा आश्रित

बनून त्याच्या शिफारसीने तो दुसऱ्या शहाआलमच्या चाकरीत शिरला. बादशहाने त्याला नगारा व पताका या मानचिन्हांसह ५० अश्वपथकाचा शिलेदार बनवले. भरीला स्वतःच्या व शिपायांच्या खर्चासाठी त्याला पहासूची (जिल्हा बुलंदशहरची) सुपीक इस्टेट देण्यात आली. महत्त्वाकांक्षी माणसाच्या दृष्टीने या अटी मोठ्याशा आकर्षक नव्हत्या, तसेच बढतीचीही तेथे शक्यता नव्हती. परिणामी आपल्या नशिबाबद्दल समाधान न वाटल्यामुळे त्याने शाही चाकरी सोडली व तो जयपूर महाराजाच्या सैन्यात दाखल झाला. जयपूरच्या चाकरीत तो किती वर्षे राहिला याची माहिती उपलब्ध नाही. परंतु लवकरच तो आग्र्याला स्थायी झालेला आपणांस दिसतो.

कूकन बेग खानाचे कुटुंब फार मोठे होते. पैकी नसरुल्ला बेग खान व अबदुल्ला बेग खान ही त्याच्या फक्त दोन मुलांचीच नावे आपल्याला ठाऊक आहेत. आपल्या पित्याप्रमाणेच त्या दोघांनीही लढाईचा पेशा निवडला. नसरुल्ला बेग खान मराठ्यांच्या नोकरीत शिरला व ग्वाल्हेर-महाराजांच्या चाकरीत असलेल्या जनरल पेरॉं या फ्रेंच माणसाच्या हाताखाली तो आग्रा किल्ल्याच्या अधिपतीच्या पदापर्यंत हळूहळू चढत गेला. अबदुल्ला बेग खान एवढा नशीबवान नव्हता. तो प्रथम लखनौला गेला त्यावेळी नवाब असफुद्दौला (१७७५-१७९७) हा वजीर होता. येथे त्याचा जम बसला नाही व लवकरच त्याला हैदराबादला जावे लागले. तेथे नवाब निजाम अली खान त्यावेळी राज्य करीत होता. येथे एक लहानसा हुद्दा मिळवण्यात त्याला यश आले व तो दक्षिणेस अनेक वर्षे राहिला. कालांतराने निजाम दरबारातील उमरावांच्या आपसातील घरगुती भांडणामुळे त्याची ही नोकरीही गेली. तेथून तो अलवारला आला व महाराव भक्तावरसिंगची (१७९१-१८०३) नोकरी त्याने धरली. परंतु दुर्दैव असे की एका स्थानिक बंडाळीचा उपशम करण्यासाठी त्याला पाठवले असता त्यातच तो मारला गेला. गालिबने लिहिलेल्या एका पत्रात हा सारा तपशील दिलेला आहे. तो लिहितो :

"माझे आजोबा वारले त्या सुमारास माजलेल्या राजकीय बंडाळीत पहासू इस्टेट परत घेण्यात आली. माझे वडील अबदुल्ला बेग खान लखनौला गेले

व नवाब असफुद्दौल्याच्या नोकरीत शिरले. थोड्या दिवसांनंतरच ते हैदराबादेस गेले व ३००/४०० घोडेस्वारांचा प्रमुख म्हणून निजाम अली खानाची चाकरी धरली. तेथे ते अनेक वर्षे राहिले. त्यांची ही नोकरी काही अंतर्गत तंट्यांमुळे गेली. त्यामुळे उद्विग्न होऊन ते पुढे अलवारकडे निघून गेले व तेथे रावराजा भक्तावरसिंगकडे नोकरी धरली; तेथे एका बंडाळीत ते मारले गेले."

अबदुल्ला बेग खानाने गुलाम हुसेन खान नावाच्या एका निवृत्त मोंगल सेनाधिकाऱ्याच्या कुटुंबाशी विवाहसंबंध जोडले होते. त्याच्या मृत्युसमयी त्याला तीन मुले होती. एक मुलगी व दोन मुलगे. थोरला मुलगा म्हणजे आपला सुप्रसिद्ध कवी गालिब. त्याचे मूळ नाव असदुल्ला बेग खान होते. त्याचा जन्म आग्रा येथे २७ डिसेंबर १७९७ रोजी झाला. अबदुल्ला बेग खानाच्या मृत्यूपूर्वी सुद्धा त्याचे कुटुंब आग्र्याला राहात असे, कारण अबदुल्ला बेग खानाच्या भटक्या जीवनामुळे ते त्याच्याबरोबर कुठेही कायमचे राहू शकत नसे. म्हणून गालिबची आई आग्र्याला आपल्या वडिलांकडेच नेहमी राही. ते लोक बरेच सधन होते व त्यांच्याजवळ बरीच स्थावर मालमत्ता होती. ती आजही आपणांस दिसू शकते. १८०२ साली, अबदुल्ला बेग खानाच्या निधनानंतर गालिब अवघा चार वर्षांचा असताना त्याचे कुटुंब त्याचा धाकटा भाऊ नसरुल्ला बेग खान याच्या आश्रयाखाली आले.

छोटीमोठी सर्व स्थानिक संस्थाने व राज्ये खलास करून व आपले प्रभावाचे क्षेत्र व मुलूख यांचा विस्तार करून ब्रिटिश सत्ता उत्तर भारतात झपाट्याने पुढे सरसावत होती, तो हा काळ होता. नसरुल्ला बेग खान आग्र्याच्या किल्ल्याचा सेनाधिपती असताना १८०३ मध्ये ब्रिटिश सरसेनाधिपती लॉर्ड लेक आग्र्याला पोचला. नबाब अहमद बक्ष खानाच्या सांगण्यावरून नसरुल्ला बेगने किल्ला लॉर्ड लेकच्या हवाली केला. अहमद बक्षाच्या बहिणीशी त्याचे लग्न झाले होते. त्याच्या या अपूर्व सेवेबद्दल ब्रिटिश आधिपत्याखाली त्याला स्वतःच्या व त्याच्या शिपायांच्या निर्वाहासाठी म्हणून दरमहा १७०० रु. वेतनासह ४०० अश्वपथकाचा अधिपती नेमण्यात आले. कालांतराने नसरुल्ला बेग खानने त्यावेळी इंदोर राज्यात असलेल्या भरतपूरच्या

नजीकचे सोंक व सुंसा हे दोन जिल्हे बळकावले. लॉर्ड लेकला ही गोष्ट समजली तेव्हा त्याने ते दोन जिल्हे नसरुल्ला बेग खानाला कायमचे बहाल केले. याचा अर्थ असा की त्याच्या आश्रयाखाली असलेल्या त्याच्या मृत बंधूच्या दुःखी कुटुंबाला तुलनेने सुखाचे व आरामाचे जीवन लाभले. दुर्दैवाने ही परिस्थिती फार काळ टिकली नाही. १८०६ साली एक दिवशी सहलीस गेला असता तो हत्तीवरून खाली कोसळला व त्यात झालेल्या दुखापतीने काही दिवसांनंतर दगावला. गालिब व त्याचा भाऊ ही अजून लहान पोरेच होती. त्यांच्या काकाच्या या अकाली निधनाने दुसऱ्यांदा त्यांच्यावरचे छत्र गेले.

नवाब अहमद बक्ष खान या सुमारास फिरोजपूर झिरका व लोहारू या दोन चिमुकल्या संस्थानांचा शास्ता बनला होता. पहिले त्याला ब्रिटिशांनी बहाल केले होते व दुसरे अलवारच्या महाराव भक्तावरसिंगाने. मरहूम नसरुल्ला बेग खानाशी त्याचे नाते असल्यामुळे त्याने आता या मुलांना स्वतःच्या निगराणी-खाली ठेवले व शिवाय त्यांच्या निर्वाहासाठी नसरुल्ला बेग खानाच्या कुटुंबाला दरमहा १०००० रुपयांचे पेन्शन देण्यासाठी लॉर्ड लेकचे मन वळवले. परंतु एका महिन्यानंतर त्याने काहीतरी करून दुसरा हुकूम काढला, त्याअन्वये पेन्शनीची सालाना १०००० रुपयांची रकम ५००० वर आली. इतकेच नव्हे तर या रकमेची वाटणी त्याने अशा रीतीने करवली की कुणा एका ख्वाजा हाजीला सालाना २००० रुपयांचा सिंहाचा वाटा मिळाला व बाकीची रकम कुटुंबातील उरलेल्या सहा जणांत वाटली गेली. यापैकी गालिबचा वाटा म्हणजे तुटपुंजे ७५० रु. सालाना.

गालिबची आई अजून आपल्या आईवडिलांजवळ राहात होती. तिचे वडील केव्हा वारले याची आपणांस माहिती नाही. मुस्लिम धर्माच्या आदेशानुसार बापाने मृत्युसमयी मागे ठेवलेल्या मालमत्तेत मुलगी आपल्या भावाबरोबर वाटेकरी असते. हा नियम जरी सार्वत्रिक पाळला जात नाही, तरी बहुतेक कुराणमतवादी कुटुंबे अजूनही तो पाळतात. म्हणून तिच्या वडिलांनी — गुलाम हुसेन खानांनी — मागे ठेवलेल्या मालमत्तेतील तिचा वारसा

तिला मिळाला असल्याची शक्यता आहे. आणि तो बराच घसघशीत असावा. म्हणून ती जिवंत असेतो गालिबला कुठलीही चणचण भासली नसावी.

## शिक्षण, बालपण

इस्लाम धर्माच्या स्थापनेबरोबर 'कुराण' हे मुसलमानांच्या दृष्टीने समग्र ज्ञानाचे केंद्र बनले. शैक्षणिक अभ्यासक्रमसुद्धा कुराणाच्या व धार्मिक शिकवणीकडे दृष्टी ठेवून आखला जाई. जे विषय विद्यार्थ्याला पुढील जीवनात धर्माची मूलभूत शिकवण समजण्यास साह्यकारक असत व इस्लामच्या शिकवणीतील सत्य व सौंदर्य जाणून घेण्यासाठी तयार करीत, तेवढेच विषय त्याला शिकविले जात. प्रत्येक खेड्यात व शहरात मशीद हेच वस्तुतः विद्येचे एकमेव केंद्र असे. सामुदायिक प्रार्थनेच्या वेळी अग्रभागी असणारा मौलवी हाच फावल्या वेळातला शिक्षकही असे. वेटाळातली मुले दररोज ठराविक तासाला मशिदीत जमत आणि कुराण व इतर प्राथमिक पुस्तके वाचण्याचे धडे त्याच्याकडून घेत. कालांतराने मोठ्या शाळा व कॉलेजे स्थापन झाली; त्यांतून उच्चतर व खास विषय शिकवले जात. शिक्षणाची ही पद्धत सर्व मुस्लिम देशांत प्रचलित होती.

मुसलमान लोक भारतात आले तेव्हा त्यांनी हीच पद्धत आपल्याबरोबर आणली. येथे सुद्धा मशिदीचा वापर मूलतः वस्तीतील शाळा म्हणून होत असे. मुले मशिदीत गोळा होत. मौलवी हाच बहुधा सर्व विषय शिकवणारा एकमेव शिक्षक असे. अशा शाळेला 'मकतब' म्हणत. ही संस्था पूर्णपणे लोपली नाही. ती लहान खेड्यांतून अजूनही दृष्टीस पडते. पुढे समाजाच्या अधिक सधन व वजनदार लोकांची घरे सुद्धा ज्ञानाच्या प्रसाराला साधनीभूत झाली. उदाहरणार्थ, एखाद्या श्रीमंत गृहस्थाचा शाळेला जाणाऱ्या वयाचा मुलगा असे. मशिदीत त्याला गावातील इतर मुलांबरोबर बसावे लागेल, मग ती कुणाची का असेनात, त्या ठिकाणी आपल्या मुलाला पाठवणे त्याला आपल्या प्रतिष्ठेला व दर्जाला साजेसे वाटत नसे. असा प्रसंग टाळण्यासाठी घरी येऊन आपल्या मुलाला शिकवण्यासाठी तो एखाद्या खास शिक्षकाला

आपल्या पदरी ठेवी. हळूहळू त्याच्या मित्राची अथवा त्याच्या दर्जाच्या लोकांची मुले सुद्धा त्याच हेतूने त्याच्या घरी येऊ लागत व अशा प्रकारे एक छोटीशी शाळाच स्थापन होई. नियमित शाळा अत्यंत तुरळक होत्या व त्या एक तर सरकारी साह्याने किंवा 'वक्फ' मार्फत चालवल्या जात. कधीकधी एखादा साहसी पंडित स्वतःच आपल्या घरी शाळा काढी. तो व त्याचे इतर काही सुशिक्षित मित्र मिळून शिक्षकवर्ग तयार होई व त्याच्यावर विश्वास ठेवणाऱ्या आईबापाच्या मुलांना अशा प्रकारे ज्ञानदान होई.

गालिबच्या शिक्षणासंबंधी फार तुटपुंजी माहिती उपलब्ध आहे. त्यावेळी मुहंमद मुअजम नावाच्या थोडीफार ख्याती मिळालेल्या एका विद्वानाने आग्र्याला एक शाळा चालवली होती, हे आपणांस ठाऊक आहे. गालिबलाही याच शाळेत पाठवण्यात आले. फारशी ही राजभाषा तसेच साहित्यिक कार्यांचे व पत्रव्यवहाराचे सार्वत्रिक माध्यम होती. तेव्हा सर्व क्रमिक पुस्तके फारशीत असणे स्वाभाविक होते. शाळेत शिकविली जाण्याचा दावा करता येईल इतका दर्जा उर्दूला तोपावेतो प्राप्त झाला नव्हता. गालिबने सुद्धा आपल्या शालेय जीवनात केवळ फारशीचाच अभ्यास केला. ही पद्धत या शतकाच्या सुरवातीपावेतो चालू राहिली. गालिबने काही अभिजात फारशी लेखकांचे थोडेफार गद्य ग्रंथ या शाळेत अभ्यासले होते असे मानतात. प्रारंभिक अवस्थेत अरबी भाषा अगदी प्राथमिक स्वरूपात तेवढी शिकवली जाई. गालिब त्या अवस्थेपलीकडे गेला नसावा. बहुधा तो या शाळेत वयाच्या १२ वर्षांपर्यंत राहिला असावा.

याच सुमारास अबदुस समद नावाचा एक फारशी विद्वान आग्र्याला येऊन पोचला, असे गालिबने लिहिले आहे. अबदुस समद हा जन्माने झोरास्ट्रियन धर्माचा होता पण सखोल अभ्यासानंतर त्याने स्वखुषीने इस्लामचा स्वीकार केला होता. फारशी व अरबी या दोन्ही भाषांत तो पारंगत होता. त्याला झोरास्ट्रियन व इस्लाम धर्मांचे परिपूर्ण ज्ञान असणे स्वाभाविक होते. या विद्वान प्रवाशाने आपल्या तरुण कवीला फारच प्रभावित केले. दोन वर्षे (१८१०–१२) आपल्या घरी राहण्यासाठी त्याने त्याचे मन वळविले. या

काळात त्याच्या मार्गदर्शनाखाली गालिबने अभ्यास केला व पुढे उर्वरित आयुष्यात त्याच्या कामास आलेले ज्ञान त्याने त्याच्याजवळ संपादन केले. दोघेही १८१२-१३ साली आग्र्याहून दिल्लीस आले, गालिब येथे कायमचा स्थायिक होण्यासाठी व अबदुस समद आपल्या शिष्याचा व तरुण मित्राचा निरोप घेण्यासाठी. गालिब हा निरलस व बुद्धिमान विद्यार्थी होता. त्याच्या उस्तादाने भारत सोडल्यावरही त्याच्याशी पत्रव्यवहार चालू ठेवला होता, असे सांगण्यात येते.

## दिल्लीत आगमन

आग्रा सोडून दिल्लीत कायमचे स्थायी होण्यास गालिब कशामुळे प्रवृत्त झाला हे ज्ञात नाही. शहाजहानच्या काळापावेतो आग्रा ही मोंगल साम्राज्याची राजधानी होती. दिल्लीला लाल किल्ला बांधून १६४६ साली आग्र्याहून दिल्लीला राजधानीचे स्थलांतर केले ते शहाजहाननेच. आग्रा हे साम्राज्यातील एक महत्त्वाचे शहर म्हणून कायम राहिले. पण इतःपर दिल्लीशी ते स्पर्धा करू शकले नाही. दिल्लीचे केंद्रीय स्थान गालिबला फार मोठे आकर्षण असावे. या शहरात कायमचे वास्तव्य करण्याचे आणखीही एक कारण संभवते. ऑगस्ट १८१० साली, तो १३ वर्षांचा असताना फिरोजपूर झरका व लोहारूच्या नवाब अहमद बक्ष खानाचे धाकटे भाऊ इलाही बक्ष खान यांच्या मुलीशी त्याने निका लावला होता. ही मंडळी दिल्लीस राहात असे आणि त्यांनी येथे येऊन स्थायिक होण्यास गालिबचे मन वळवले असण्याचा संभव आहे.

लोहारूच्या राजघराण्याची स्थापना नवाब अहमद बक्ष खानाने केली होती. गालिबचा आजोबा कूकन बेग खान याने जेव्हा मध्य आशियातून देशांतर केले त्याच वेळी, म्हणजे १८ व्या शतकाच्या मध्यात, नवाब अहमद बक्ष खानाचा बाप मिर्झा अरिफ जान आपल्या दोन भावांसह भारतात आला असा निर्देश मिळतो. पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे नवाब अहमद बक्ष खानाच्या बहिणीचे नसरुल्ला बेग खान या गालिबच्या काकाशी लग्न झाले होते. यावरूनही असे दिसते की बहुधा या दोन कुटुंबांत निकटचे संबंध होते व त्यामुळेच

आणखी एका वैवाहिक संबंधातून ते अधिक दृढ करण्यास ते प्रवृत्त झाले असावे.

सुरवातीला अहमद बक्ष खान घोड्यांचा व्यापार मोठ्या प्रमाणात करीत असे. काही काळानंतर ग्वाल्हेरच्या महाराजाशी त्याचा संबंध आला व त्याने तो धंदा सोडून दिला. पण तो फार काळ महाराजाजवळ न राहता अलवारला गेला. लौकरच त्याने अलवारच्या राजाचा विश्वास संपादन केला, तो इतका की, मराठ्यांविरुद्ध लॉर्ड लेकने केलेल्या मोहिमेत त्याला मदत करण्यासाठी अलवारच्या राजाने जी फौज पाठविली होती तिचा सेनापती त्याला नेमण्यात आले. आपल्या शौर्याने व सारासारविचारशक्तीमुळे लॉर्ड लेकचा तो अतिशय महत्त्वाचा साहाय्यक बनला. त्याच्यावर लॉर्ड लेकचा इतका पुरेपूर विश्वास होता की भारतीय संस्थानिक व राज्ये यांच्यासंबंधीचे जवळपास सगळे निर्णय त्याने अहमद बक्ष खानच्या सल्ल्यानेच घेतले. १८०३ मध्ये लॉर्ड लेकने पश्चिम संयुक्तप्रदेशाचा अफाट मुलूख काबीज केला, तेव्हा त्याने अहमद बक्ष खानाला फिरोजपूर झरका, पालवाल व होडल इ. जिल्हे बहाल केले. लॉर्ड लेकने भरवलेल्या या पदस्थापनेच्या दरबाराला, आपण उणे पडल्याचे दिसू नये म्हणून हजर राहिलेल्या अलवारच्या महाराजानेही खानाच्या गौरवास्पद व इमानी सेवेबद्दल लोहारू संस्थान त्याला बक्षीस दिले. अशा प्रकारे अहमद बक्ष खान हा फिरोजपूर झरका व लोहारूचा पहिला राज्यकर्ता बनला.

फिरोजपूर ही जरी त्याची राजधानी होती, तरी नवाब अहमद बक्ष खान आपला बहुतेक काळ ब्रिटिशांनी उत्तरेकडील जिल्ह्यांसाठी आपले प्रशासकीय बनवलेल्या दिल्लीत घालवीत असे. नवाबाचा धाकटा भाऊ इलाही बक्ष खान दिल्लीत कायमचा रहिवासी झाला होता. इलाही बक्ष प्रतिष्ठित कवी होता एवढेच नव्हे, तर धार्मिक गोटातही त्याचा चांगला परिचय होता. 'मारूफ' या टोपणनावाने तो उर्दू कविता लिहीत असे.

## उर्दू भाषा

मुसलमानांचा या देशातील लोकांशी जो निकट संपर्क आला त्यातून उर्दू भाषेच्या विकासास फार मोठी चालना मिळाली. एखादी भाषा अंतिम स्वरूप

धारण करण्यापूर्वी विकासाच्या अनेक अवस्थांतून जात असते. उत्तर भारतात ही प्रक्रिया बऱ्याच काळापासून चालू होती व ती अशा अवस्थेला येऊन पोचली होती, जेथे एका नवीन भाषेने जन्म घेणे क्रमप्राप्त होते. नेमके याच प्रसंगी मुसलमान लोक येथे येऊन पोचले, हा केवळ एक अपघात. त्यांनी आपल्याबरोबर फारशी ही आर्यन भाषावंशातील आणखी एक भाषा आणली. तिच्यामागे एक महान व संपन्न साहित्यिक परंपरा होती. शिवाय ती विजेत्यांचीही भाषा होती, हा आणखी एक फायदा तिला होता. स्वाभाविकपणेच फारशी राजभाषा बनली. आपल्या नव्या राजकर्त्यांची चाकरी किंवा अनुग्रह मिळवण्याच्या दृष्टीने ज्यांनी ती शिकायला सुरवात केली, त्या सुशिक्षित वर्गातही तिचा प्रसार झाला. भाषिक क्षेत्रात बऱ्याच काळापासून जी खळबळ चालू होती तिला आता फारशीच्या प्रभावाने व परिणामाने उधाण येऊन ज्या नव्या भाषेचा जन्म झाला, तीच कालांतराने उर्दू म्हणून ओळखली जाऊ लागली. नवी भाषा कसेही करून उदयास आलीच असती, कारण तिच्या जन्माची प्रक्रिया पूर्ण झाली होती. फक्त एका ठिणगीची गरज होती. ती वायव्य सीमा ओलांडून आपल्या संपूर्ण ताकदीनिशी येथे येणाऱ्या मुसलमानांनी पुरवली. ही नवी भाषा तिचा शब्दसंग्रह, वाक्यप्रचाराची पद्धत व व्याकरण या सर्व बाबतींत मूलतः भारतीय होती. तिच्या सर्व क्रियापदांचा उगम भारतीय होता. मुसलमानांचा वाटा फक्त लिपी, काही टक्के फारशी शब्द आणि काही इराणी कल्पना व वाक्प्रचार यांपुरता मर्यादित होता.

आरंभी ही भाषा मुस्लिम संतांनी बव्हंशी धार्मिक प्रवचने व प्रचारासाठी वापरली. सुरवातीचे गद्य व पद्य असे दोन्ही प्रकारचे उर्दू लिखाण नीतिशास्त्रीय व नैतिक भावनांनी ओतप्रोत भरलेले आहे. हे लेखक बहुतांशी फारशी भाषेचेही पंडित असल्यामुळे त्यांनी फारशी कल्पनांचा व वैचारिक आशयाचा विपुल वापर केला. कालांतराने या भाषेला अधिक नेमकेपणा आला व अभिजात फारशी भाषेतील उसनवारी अधिक सामान्य स्वरूपाची होत गेली. पण ती सगळीच कृत्रिम होती; कारण फारशी वाक्प्रचारांचा व उपमांचा वापर करणारे कवी इराणला कधीच गेलेले नसल्यामुळे, त्यांचे ज्ञान

केवळ फारशी अभिजात ग्रंथांवरूनच मिळवलेले असे. अशा प्रकारे त्यांचे काव्य म्हणजे केवळ काल्पनिक व कृत्रिम निर्मिती असे. 'मीर' किंवा 'दर्द' यांसारखे एकदोन कवी सोडल्यास, बहुतेक उर्दू कवी अभिनव विचार वा मौलिकता यांच्या अभावी ठराविक धर्तीचे लेखन करीत राहिले.

## काव्याचा श्रीगणेशा

आग्रा येथील शाळेत शिकत असतानाच गालिबने काव्य-लेखनाची सुरवात केली. सुरवातीला तो फारशी भाषेतही लिहीत असे, परंतु लवकरच तो वेगाने विकसित झालेल्या व सुशिक्षित वर्गात लोकप्रिय होत गेलेल्या उर्दू भाषेकडे वळला. तिच्यातच सर्वथैव लिहिण्याचे बंधन त्याने घालून घेतले. त्याच्या शालेय शिक्षणात बहुतेक अभिजात फारशी भाषेचाच अंतर्भाव होता हे आपण पाहिलेच. अबदुस समदच्या सान्निध्यात तो पुढे फारशीचा प्रगाढ पंडित व तिचा पूजक बनला. त्याच्या बाल्यावस्थेपासून 'शौकत', 'बुखारी', 'असीर' व 'बेदिल' यांसारख्या फारशी कवींनी तो अतिशय आकर्षित झाला होता. अमूर्त व कल्पनाप्रचुर लेखनाबद्दल हे कवी विख्यात आहेत. गालिब उर्दू भाषेत त्यांचे अनुकरण करू लागला. उर्दू केवळ नवीन भाषा होती असे नाही, तर गालिबने आपल्या काव्याची प्रेरणा या फारशी कवींपासून, विशेषतः आशय व आकार या दोन्ही बाबतीत फारशी भाषेतील बहुधा सर्वात अवघड व संभ्रमात टाकणाऱ्या 'बेदिल'पासून, घेतली असल्या-मुळे गालिबच्या कल्पनांसाठी उपयुक्त होईल असा प्रभावी शब्द-संग्रह व वाक्प्रचारही तिच्याजवळ अजून नव्हते. याचा परिणाम फारसा चांगला झाला नाही. गालिबची सुरवातीची कविता अशा भाषेत आहे जी एखाददुसरा शब्द इकडे तिकडे वगळल्यास पूर्णतः फारशीच आहे. पुष्कळदा अतिशय क्षुल्लक व सामान्य कल्पना गुंतागुंतीच्या व क्लिष्ट शैलीत आविष्कृत केलेल्या आहेत. त्यामुळे ती दुर्बोध बनली आहे. त्यामुळे साहजिकच, समकालीनांकडून त्याच्यावर प्रतिकूल टीका झाली. त्यांनी त्याच्या रचनांवर अर्थशून्य असा शिक्का मारला. हा आरोप बराचसा खरा आहे. आपणांस उपलब्ध असलेले

त्याचे सुरवातीचे बहुतेक लिखाण समजायला कठीण आहे व अनेकदा 'डोंगर पोखरून उंदीर काढला' ही म्हण सार्थ करणारे आहे. पण, सुदैवाने या तरुण कवीला हतोत्साह करण्यात या विरोधकांना यश आले नाही. त्याने निर्भीडपणे व निर्भयपणे त्याच आडंबरपूर्ण शैलीत लिहिणे चालू ठेवले. त्यावर टीका करणारे काही लोक होते, तर मौलिकता व नवप्रयोग यांबद्दल त्याची प्रशंसा करणारेही दुसरे लोक होते. असा एक प्रशंसक होता नवाब हसमुद्दौला, एक थोर उमराव व खुद्द एक कवी. एकदा लखनौला गेला असताना, त्याने गालिबच्या काही उर्दू कविता महान कवी 'मीर'ला दाखवण्यासाठी आपल्याबरोबर नेल्या. मीर आता हिंडण्याफिरण्याच्या दृष्टीने अतिवृद्ध झाला होता व तो बहुधा घरातच राही. या विख्यात कवीला नवाबाने त्या गजला दाखवल्या तेव्हा त्याने असे अर्थपूर्ण उद्गार काढले की या तरुण मुलाला मार्गदर्शन करण्यास एखादा लायक उस्ताद मिळाला तर तो एक महान कवी होईल, नाहीतर तो भारूडच लिहीत राहील.

हा लायक उस्ताद दुसरातिसरा कोणी नसून त्याचे स्वतःचेच व्यवहारज्ञान; किंवा तो चुकीच्या मार्गाने जाताना दिसे तेव्हा त्याला योग्य मार्गावर आणण्याचा प्रयत्न करणारे त्याचे सच्चे मित्र. तो बहुप्रसू लेखक होता; व मीरबद्दलच्या गोष्टीने हे सिद्ध होते की फार लवकर आपली छाप पाडण्यात त्याला यश आले होते. आपणांस ठाऊक आहे की मीर २० सप्टेंबर १८१० साली निधन पावला, तेव्हा गालिब पुरा १३ वर्षांचा सुद्धा नव्हता. आपणांस हेही ठाऊक आहे की गालिबने अगदी अल्पवयातच म्हणजे १० किंवा ११ वर्षांचा असतानाच कविता लिहायला सुरवात केली होती. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे, तर मीरला त्याच्या गजला दाखवल्या गेल्या तेव्हा तो दोन-तीन वर्षांपासून लिहीत असावा. मीरचे स्थान एकंदर उर्दू साहित्यात व विशेषतः उर्दू काव्यात अजोड आहे. गजल-लेखनात त्याचे स्थान स्वतंत्र असून त्याच्या सर्व अनुवर्ती साहित्यिकांनी त्याला सर्वोत्कृष्ट कवी म्हणून मान्यता दिलेली आहे हे सर्वमान्य सत्य आहे. पहिली गोष्ट म्हणजे कुणीतरी गालिबच्या गजला मीरपाशी नेण्यास धजावे ही गोष्टच मुळी अतिशय अर्थपूर्ण आहे;

कारण समकालीनांबद्दलची मीरची अतीव तुच्छता जगजाहीर आहे. दुय्यम दर्जाच्या कवीची किंवा त्याच्या काव्याची क्वचितच दखल घेणारा असा तो एकच कवी. नवाब हसमुद्दौला हा स्वतः मीरचा शिष्य होता. त्यामुळे मीरचा स्वभाव अधिक चांगल्या रीतीने जाणू शकणारा त्याच्याशिवाय दुसरा कोणीच नव्हता. त्याने मीरकडे गालिबच्या गजला नेणे हेच दर्शविते की तो स्वतः गालिबच्या प्रतिभेचे कौतुक करणारा तर होताच, पण मीरकडून त्याचे स्वागत अशा प्रकारे केले जाईल याचीही त्याला खात्री होती. आणि पुन्हा मीरने दिलेला शेराही खास त्याच्या स्वभावानुरूप आहे. गालिबसंबंधींचे त्याचे अचूक अनुमान ही या महान कलाकाराच्या समीक्षाबुद्धीची साक्ष आहे.

उर्दू काव्यात उस्ताद व शागीर्द ही परंपरा इराणमधून आली. एखादा तरुण कविता लिहिण्यास सुरवात करी, तेव्हा तो साधारणतः एखाद्या कसलेल्या कवीकडे मार्गदर्शनार्थ जाई. जे काही तो लिही, ते तो त्या ज्येष्ठ कवीला दाखवी. तो त्याचे लिखाण दुरुस्त करी, एवढेच नव्हे तर त्याला भाषेचे बारकावे व काव्याचे तंत्रही शिकवी. ही परंपरा इतकी खोल रुजली होती की कोणत्याही कवीला मार्गदर्शक न घेणे अशक्यप्राय असे. पुष्कळ वेळा शागीर्द आपल्या रचना उस्ताद जिवंत असेतो त्याला दाखवीत असे. गालिबला या शब्दाच्या रूढ अर्थाने कधीही 'उस्ताद' नव्हता. प्रारंभिक अवस्थेत त्याने कुणाचा सल्ला घेतला असल्यास नकळे. पण काव्यरचनेची कला ही आपल्याला मिळालेली ईश्वरी देणगी होय असा दावा तो आपल्या उत्तर आयुष्यात करीत असे, याची मात्र आपणांस माहिती आहे. मीरचे भाकित अशा रीतीने अंशतः खरे ठरले. स्वतःच्या व्यवहारज्ञानाव्यतिरिक्त गालिबचे मार्गदर्शन करायला नियमित असा कोणताच गुरू नव्हता, तरीही तो एक महान कवी बनला.

दिल्लीला आल्यावर बहुधा तो आपल्या सासुरवाडीस राहिला असावा. त्याच्या एका फारशी पत्रावरून असे दिसते की पुढे यथाकाल त्याने स्वतः-साठी घर विकत घेतले व तेथे तो राहायला गेला. पण इलाही बक्ष खान या आपल्या सासऱ्याकडे तो किती दिवस राहिला, याची माहिती नाही. कसेही असले तरी हे वास्तव्य त्याला अतिशय लाभदायक ठरले.

त्या काळी, बहुतेक धनिक व विद्वान लोकांची निवासस्थाने म्हणजे युरोपातील उमरावांच्या ‘salons’ प्रमाणे, साहित्यिक, कवी व कलावंत यांची भेटण्याची स्थाने होती. त्यांच्या हितसंबंधाची जपणूक व वाढ करण्याची जबाबदारी स्वतःवर घेणारे यजमान त्यांना आश्रय देत. त्या तरुण वयातले गालिबचे दिल्लीतील वास्तव्य, व इतक्या वजनदार आणि विख्यात कुटुंबाशी असलेले त्याचे निकटचे संबंध, यांमुळे दिल्लीतील उच्चवर्गीय समाजाशी ताबडतोब परिचय होण्यास त्याला मदत झाली. हे संबंध पुढे त्याला अतिशय उपयोगी ठरले. या काळात त्याच्या ज्यांच्याशी ओळखी झाल्या त्यांत पंडित व कवी, मुत्सद्दी व परमार्थी, संत व राजकारणी अशी सर्व प्रकारची माणसे होती. त्यांनी पुढील आयुष्यात त्याच्या सुखदुःखात साथ दिली व त्यांच्या साह्याचा त्याला अशा प्रकारे फायदा झाला.

## पेन्शनीचा झगडा

गालिब आता कुटुंबाचा पोषणकर्ता तरुण पुरुष झाला होता. आग्र्याला असेतो त्याच्या आईने त्याची काळजी घेतली व दिल्लीला स्थलांतर केल्यावरही तिने ती घेतली असणे शक्य आहे. नवाब अहमद बक्ष खानही गरज पडेल तेव्हा त्यास मदत देऊ करीत. परंतु ही सारी अनिश्चित व यदाकदाभावी असे. त्याचे एकमेव कायम उत्पन्न म्हणजे नसरुल्ला बेग खानाच्या म्हणजे त्याच्या काकाच्या मृत्यूनंतर त्याच्या कुटुंबाला ब्रिटिशांनी नेमून दिलेल्या सालाना ५००० रु. पेन्शनीतला ७५० रु. चा त्याचा वाटा. परंतु त्याची परिस्थिती खालावण्यास फार वेळ लागला नाही.

नवाब अहमद बक्ष खानाला तीन मुलगे होते. त्यांच्यापैकी सर्वांत थोरल्या शमसुद्दीन अहमद खानाचे कुटुंबातील इतरांशी वाकडे झाले. परिणामी त्या तरुण माणसाची वृत्ती त्या सर्वांच्या बाबतीत द्वेषपूर्ण व विषारी बनली. नवाब अहमद बक्ष खानाचा तो वारसदार असल्याने नवाबाला अशी भीती वाटत होती की त्याच्या मरणानंतर स्वाभाविकच त्याच्या हाती सत्ता आल्यावर तो आपल्या धाकट्या दोन भावांना कदाचित वाईट वागवील. ही आपत्ती

टाळण्याच्या हेतूने व ब्रिटिशांना आणि आपल्या कुटुंबाला निर्विवाद तोंड सुचविण्याच्या दृष्टीने त्याने १८२६ मध्ये पदत्याग केला आणि शमसुद्दीन खानाला फिरोजपूर झरका व लोहारूचा अधिपती बनवले. पण ते या अटीसह की लोहारूपासून येणारे सर्व उपन्न धाकट्या दोन भावांना दिले जावे. या व्यवस्थेचा गालिबच्या परिस्थितीवर निर्णायक परिणाम झाला. १८०६ मध्ये केलेल्या व्यवस्थेनुसार ५००० रु. सालाना पेन्शन त्याला व त्याच्या कुटुंबाला फिरोजपूर झरका व लोहारू या दोन संस्थानांच्या उत्पन्नातून दिले जाई. यापुढे आता शमसुद्दीन अहमद खान हा वेतनदाता झाला. त्याचे त्याच्या दोघां भावांशी वितुष्ट असल्यामुळेच व गालिब त्यांचा हितचिंतक असल्यामुळे त्याने गालिबशी शत्रुत्व धरले आणि वेळेवर त्याच्या पेन्शनीचा वाटा मिळू नये म्हणून सर्व प्रकारचे अडथळे त्याच्या मार्गात उभे करायला सुरवात केली, आणि शेवटी तर ते देणेच पूर्णपणे बंद केले.

### एक प्रेम-प्रकरण

याच सुमारास एक प्रेमसंबंधविषयक घटना घडलेली आपणांस आढळते. तिचा चिरकालीन ठसा गालिबच्या मनावर उमटला. यावेळी तो तरुण, सुमारे २५ वर्षांचा, सुदृढ व सुंदर आणि बऱ्याच संपन्न स्थितीत होता. ज्या समाजात तो जगत व वावरत असे तो एखादी रखेली वा उपस्त्री ठेवण्यात कुणाला हरकत घेत नसे, एवढेच नव्हे तर बऱ्याच अंशी ते तत्कालीन सुखवस्तू लोकांच्या प्रतिष्ठेचे प्रतीक समजले जाई. पंडित, साहित्यिक, राजकारणी, धर्मशास्त्री व दरबारातील अमीर-उमराव अशा सर्व वर्गांच्या लोकांनी आपल्या घरांत नर्तिका व रखेल्या कायमच्या बाळगलेल्या होत्या. अवनत समाजात लोकांच्या मनातील नैतिक धागा सामान्यः कच्चा पडतो व परिणामी तो समाजातील लोकांना नेहमी मुबलक मुभा देतो. १८ व्या शतकाच्या सुरवातीपासूनच दिल्लीच्या केंद्रीय सत्तेचा सतत ऱ्हास होत होता. मोंगल राजवंशाच्या उत्तर काळातील सम्राटांनी जी काय सत्ता व प्रतिष्ठा अनुभवली ती सर्वस्वी त्यांच्या पूर्वजांच्या वैभवामुळे व कीर्तीमुळे होती, त्यांची स्वतःची नव्हती. औरंगजेबाच्या

काळापर्यंत एका पाठोपाठ तख्तनशीन होणारे सम्राट हे श्रेष्ठ दर्जाचे, उत्तम प्रशासक, बुद्धिसंपन्न व मूलतःच कर्तृत्ववान होते. त्यांच्यापैकी प्रत्येकजण प्रसंग पडल्यास आपले कर्तृत्व दाखवी. परिणाम असा झाला की साम्राज्याचा केवळ भौगोलिक दृष्ट्याच विस्तार झाला नाही, तर ते सुव्यवस्थित व सत्ता संपन्नतेच्या दृष्टीने सुसंघटित राखले गेले. खजिना गच्च भरलेला होता, व सैन्य तालमीतले व पूर्ण संतुष्ट होते. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर, या अफाट साम्राज्याच्या विभिन्न भागांनी केंद्रीय सरकारचे जू हळूहळू फेकून दिले. राजधानीतील दरबारी लोक बादशहाकडून एखादे पद किंवा लाभ मिळवण्याच्या उद्देशाने एकमेकांविरुद्ध कट रचीत. हे लढणारे गट समोर ठाकले असता चहूकडे असुरक्षिततेची परिस्थिती निर्माण झाली होती. प्रत्येकाजवळ भरपूर फावला वेळ असे व तो सत्कारणी कसा लावावा हे कुणालाही समजत नसे. राजकारणी लोकांचे वर्चस्व होते व भरपूर विरोध होऊनही धर्म व नीतिमत्ता वाऱ्यावर भिरकावून देण्यात आली होती. अशा परिस्थितीत, प्रत्येकाला आपल्या चिंता मदिरा, मदिराक्षी व द्यूत यांत बुडवून टाकाव्याशा वाटत.

गालिबची प्रेयसी कुठल्या वर्गाची स्त्री होती, याची माहिती नाही. बऱ्याच काळानंतर त्याने लिहिलेल्या एका पत्रात या प्रकरणाचा उघड उल्लेख आहे. तो तिला 'डोमनी' म्हणतो, म्हणजे नाचगाणे करणारी मुलगी. हे अनुमान जर बरोबर असेल तर असे दिसते की ती तरुणपणीच वारली असावी, कारण त्याच्या सुरवातीच्या कवितेत एक 'विलापिका'–'मर्सिया'–आहे, ती त्याने बहुधा तिच्याबद्दल मृत्युशोक प्रगट करण्यासाठी लिहिली होती. ती अशी :

दर्द से मेरे है तुझको बेक़रारी हाये हाये
क्या हुई ज़ालिम तिरी ग़फ़लत-शिआरी[1] हाये हाये ॥ १ ॥
तेरे दिल में गर न था आशोबे-ग़म[2] का हौसला
तूने फिर क्यों की थी मेरी ग़मगुसारी[3] हाये हाये ॥ २ ॥

---

१. बेसावध वागणे. २. दुःखाची व्याकुळता सहन करण्याची शक्ती. ३. दुःखात सहभागी होणे.

क्यों मिरी ग़मख्वारगी का तुझको आया था खयाल
दुश्मनी अपनी थी मेरी दोस्तदारी हाये हाये ॥ ३ ॥
उम्र भर का तूने पैमाने-वफ़ा[१] बांधा तो क्या
उम्र की भी तो नहीं है पायदारी हाये हाये ॥ ४ ॥
ज़हर लगती है मुझे आब-ओ-हवाए-ज़िन्दगी
यानी तुझसे थी इसे नासाज़गारी[२] हाये हाये ॥ ५ ॥
गुलफ़िशानी हाय नाज़े-जल्वा[३] को क्या हो गया
ख़ाक पर होती है तेरी लालाकारी[४] हाये हाये ॥ ६ ॥
शर्मे-रूस्वाई[५] से जा छुपना नक़ाबे-ख़ाक[६] में
खत्म है उल्फ़त की तुझ पर परदादारी हाये हाये ॥ ७ ॥
ख़ाक में नामूसे-पैमाने-मुहब्बत[७] मिल गई
उठ गई दुनिया से राहो-रस्मे-यारी[८] हाये हाये ॥ ८ ॥
हाथ ही तेग़ आज़मा का काम से जाता रहा
दिल प इक लगने न पाया ज़ख़्मे-कारी[९] हाये हाये ॥ ९ ॥
किस तरह काटे कोई शबहाए-तारे-वर्षाकाल[१०]
है नजर खूकरदए-अख़्तर-शुमारी[११] हाये हाये ॥ १० ॥
गोश-महजूरे-पयाम-व चश्म-महरूमे-जमाल[१२]
एक दिल, तिस पर यह ना उम्मीदवारी हाये हाये ॥ ११ ॥
इश्क़ ने पकड़ा न था, 'ग़ालिब' अभी वहशत का रंग
रह गया था दिल में जो कुछ ज़ौक़े-ख़्वारी[१३] हाये हाये ॥ १२ ॥

---

१. एकनिष्ठेचे वचन. २. प्रतिकूलता. ३. सौंदर्याभिमानाचे विभ्रम. ४. फुलपानांचा शृंगार. ५. अपकीर्तीची भीती. ६. मातीचा पडदा (कबर). ७. प्रेमवचनाचा आदर. ८. मैत्रीची रीत. ९. खोल घाव. १०. वर्षाकाळातील अंधाऱ्या रात्री. ११. तारे मोजण्याची सवय. १२. कान वार्तेपासून व डोळे सौंदर्यापासून वंचित आहेत. १३. प्रेमपूर्तीची हौस, इच्छा.

असे दिसते की ती प्रतिष्ठित वर्गांपैकी असावी. कारण कवितेत सूचित केले आहे ते असे की त्याच्या प्रेमप्रकरणाने तिच्या आप्तेष्टांत व समाजात लोकापवाद पसरेल या भीतीने तिने बहुधा आत्महत्या करून घेतली होती. ती सामान्य गणिका असती तर तिला आत्महत्येस प्रवृत्त करायला लोकापवादाचा किंवा अप्रतिष्ठेचा प्रश्नच उद्भवला नसता. या सुरवातीच्या प्रेमप्रकरणाने गालिबच्या तरुण मनावर कायमचा ठसा उमटला. त्याच्या वेळच्या सामाजिक परिस्थितीत त्याचे असेच दुसरेही भावनात्मक संबंध जुळले असल्याची शक्यता आहे. परंतु कोणतीच निश्चित माहिती उपलब्ध नाही.

अशा सामाजिक वातावरणात राहात असताना गालिबला भोवतालच्या परिस्थितीच्या प्रभावापासून स्वतःची सुटका करून घेता आली नाही. त्याने मद्यपान सुरू केले व अधूनमधून तो जुगारही खेळत असे. त्याव्यतिरिक्त त्याने रखेली ठेवल्याचेही दिसते. या सवयी पुरेशा पैशाच्या नियमित पुरवठ्याविना चालणे शक्य नव्हते. दुर्दैवाने तो त्याच्याजवळ नव्हता. आग्र्याला त्याची आई जिवंत होती, तोपर्यंत तिने त्याला पुरेसा पैसा पुरवला असावा. कौटुंबिक संबंधामुळे व नैतिक बांधिलकीमुळे, अहमद बक्ष खानाने बऱ्याच समाधानकारक रीतीने त्याची काळजी वाहिली. परंतु नवाबाच्या पदच्युती-नंतर परिस्थिती आणखीच बिघडली. गालिबची आर्थिक स्थिती झपाट्याने खालावली व त्याला डोईजड कर्ज झाले. अशा परिस्थितीत माणूस नेहमीच दुसऱ्यावर खापर फोडतो.

## पेन्शन प्रकरण

पूर्वी उल्लेखिल्याप्रमाणे, गालिबचा काका नसरुल्ला बेग खान १८०६ मध्ये मरण पावल्यानंतर, लॉर्ड लेकने त्याच्या निराधार कुटुंबास पेन्शन देण्याचा पहिला हुकूम काढला होता, तो सालाना १०००० रु. चा होता. त्यानंतर नवाब अहमद बक्ष खानाने हा हुकूम कोण जाणे कसा बदलून घेतला. त्यानुसार ही रक्कम निम्मी करण्यात आली आणि ती घेणाऱ्यांत कुणा एका ख्वाजा हाजीचे नाव समाविष्ट करण्यात आले. गालिबला हा दुसरा हुकूम

ठाऊक नव्हता. त्याची अजून खात्री होती की पेन्शनीची रक्कम सालाना १०००० रु. आहे. आता त्याची आर्थिक स्थिती डबघाईची झाली होती, तेव्हा त्याला एकाएकी आठवले की इतकी सारी वर्षे त्याच्यावर व त्याच्या कुटुंबावर अन्याय झाला आहे, कारण १०००० ऐवजी केवळ ५००० रु. देण्यात आले होते. आणि एवढेच नव्हे तर नसरुल्ला बेग खानाच्या परिवारात कोणत्याही प्रकारे सामील होण्याचा हक्क नसलेल्या एका परक्या व्यक्तीला या वारशात सहभागी केले गेले होते. तेसुद्धा आक्षेपार्ह होते, पण जणू जखमेवर मीठ चोळावे, तसा या पेन्शनीत त्याला सर्वांत मोठा वाटा देण्यात आला होता. ही चूक दुरुस्त करून घेण्याच्या उद्देशाने गालिब सर्वप्रथम अहमद बक्ष खानाकडे गेला. त्याला न्याय देण्यात येईल असे सांगून नवाबाने गालिबाचे सांत्वन केले. परंतु त्याने कुठलेही निश्चित पाऊल उचलले नाही. म्हणून गालिब अधीर झाला व पेन्शन मुळात लॉर्ड लेकने दिले असल्यामुळे, कलकत्त्याला जाऊन वरिष्ठ सरकारपुढे आपला हक्क मांडण्याचे त्याने ठरविले.

## कलकत्त्याचा प्रवास

कानपूर, लखनौ, बांदा, अलाहाबाद, बनारस, मुर्शिदाबाद या मार्गे लांबलचक व खडतर प्रवास केल्यानंतर गालिब अखेर फेब्रुवारी १८२८ च्या सुरवातीस कलकत्त्याला जाऊन पोचला. पुढच्या एप्रिल अखेरीकडे त्याने आपला पहिला अर्ज गव्हर्नर जनरलकडे सादर केला. त्यात त्याने खालील विनंती केली :

(१) लॉर्ड लेकने १८०६ च्या मे मध्ये मयत नसरुल्ला बेग खानाच्या निराधार कुटुंबास सालाना १०००० रु. चे पेन्शन मंजूर केले होते. त्याऐवजी आतापर्यंत फक्त ५००० रु. ची रक्कम देण्यात आली आहे. मूळची १०००० रु. ची रक्कम देण्यात यावी.

(२) पेन्शन नसरुल्ला बेग खानाच्या निराधार कुटुंबासाठी म्हणून होते, पण त्यात एक परका (ख्वाजा हाजी), ज्याचा नसरुल्ला खानाशी किंवा त्याच्या कुटुंबाशी कोणताच संबंध नव्हता, त्याचा पेन्शन-

दारांत समावेश केला गेला आहे आणि आता त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या दोन मुलांना या वाट्याचा हक्कदार बनवण्यात आले आहे. हे बंद करावे.

(३) मूळची मंजूर केलेली १०००० रु. ची रक्कम व प्रत्यक्ष देण्यात आलेली ५००० रु. ची रक्कम यांच्यातील ५००० रु. च्या तफावतीचा हिशेब केला जावा व सर्व बाकी कुटुंबास देण्यात यावी. यात ख्वाजा हाजीला चुकीने दिल्या गेलेल्या सालाना २००० रु. चा ही समावेश व्हावा.

(४) यापुढे पेन्शन सरकारी खजिन्यातून दिले जावे, फिरोजपूर झरका संस्थानाकडून नव्हे.

नवाब अहमद बक्ष खान ऑक्टोबर १८२७ मध्ये वारला, हे वर्तमान प्रवासात असताना गालिबला मुर्शिदाबादेस कळले. आता हा खटला उघडच गालिब आणि बापाच्या हयातीतच फिरोजपूर झरक्याचा शासक बनलेला शमसुद्दीनखान हा नवाबाचा थोरला मुलगा, या दोघांच्या मधला झाला. शमसुद्दीन अहमद खानाने उत्तरादाखल, ज्याअन्वये पेन्शनीची मूळची रक्कम १०००० रु. वरून ५००० रु. वर कमी करण्यात आली होती, तो लॉर्ड लेकचा दुसरा हुकूम सरकारला सादर केला. आपला १०००० रु. बद्दलचा दावा आणि थकलेली बाकी रक्कम देण्याबद्दलचा अर्ज न्याय्य आहे, हे सिद्ध करण्यासाठी गालिबने असा मुद्दा मांडला की हा दुसरा हुकूम बनावटी आहे आणि कोणत्या तरी संशयास्पद उपायांनी पैदा केलेला आहे. त्याचे म्हणणे असे होते की सर्व दस्तावेजांच्या अधिकृत नकला सरकारी दप्तरात न चुकता राखून ठेवल्या जातात, ही वस्तुस्थिती असून सुद्धा या हुकुमाची नक्कल कलकत्त्याच्या किंवा दिल्लीच्या कोणत्याही सरकारी कागदोपत्री नाही. दुसरे म्हणजे, हा दस्तावेज फारशी भाषेत होता, त्यावर लॉर्ड लेकची किंवा निदान त्याच्या चिटणिसाची तरी सही (अशा प्रकरणी प्रथा होती त्याप्रमाणे) असायला हवी होती. शमसुद्दीन खानाने हजर केलेल्या दस्तावेजावर ती सही नव्हती. म्हणून हा दस्तावेज खोटा असून पर्यायाने अविश्वसनीय आहे.

आणि शेवटी म्हणजे, लॉर्ड लेकच्या सहीने जारी झालेला व कौन्सिल-सह-गव्हर्नर-जनरलने संमत केलेला व ज्याची प्रत कलकत्त्याच्या कचेरीत होती तो सालाना १०००० रु. च्या देणगीचा पूर्वीचा हुकूम, काही असले तरी त्याने रद्द केला जाऊ शकत नाही, असा प्रतिवाद त्याने केला.

गालिबची कैफियत इतकी साधार व इतक्या कुशलतेने मांडलेली होती, की भारत सरकारचा सरचिटणीस लॉर्ड स्विन्टन याची पक्की खात्री झाली की नवाबाने पेश केलेला दस्तावेज खरा नाही व म्हणून गालिबचा दावा मान्य केला जावा. परंतु ज्यावेळी या जहागिरी व देणग्या देण्यात आल्या होत्या, त्यावेळी लॉर्ड लेकचा चिटणीस सर जॉन मालकम होता, म्हणून तो दस्तावेज त्याच्या अभिप्रायार्थ मुंबईला रवाना करण्यात आला. तो त्यावेळी तेथे लेफ्टनंट गव्हर्नर होता. सर जॉन मालकमने गालिबच्या मुद्द्यांचा परामर्श घेण्याऐवजी असे मत व्यक्त केले की, नवाब अहमद बक्ष खान हा एक प्रतिष्ठित गृहस्थ आणि लॉर्ड लेकचा विश्वासपात्र मित्र होता. म्हणून तो अशा प्रकारचा खोटा दस्तावेज करण्याची नीचता करील हे असंभवनीय आहे. या गोष्टीवर आपले विधान आधारून सर जॉन यांनी निर्णय दिला की हा दस्तावेज अधिकृत असला पाहिजे व तो पुराव्यादाखल मान्य केला जावा. यावर कौन्सिल-सह-गव्हर्नर जनरलने निर्णय घेतला की चालू व्यवस्थेत कोणताही फेरफार करण्यास सरकारची तयारी नाही. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर गालिबचा खटला खारीज करण्यात आला.

गव्हर्नर जनरलच्या अखेरच्या निवाड्यासाठी गालिब थांबला नाही. कलकत्ता सोडून तो १८२९ च्या नोव्हेंबर अखेरीस दिल्लीला परतला होता. परंतु कलकत्त्याची त्याची भेट ही अनेक कारणांमुळे त्याच्या जीवनातील एक परिवर्तक घटना ठरली.

## कलकत्त्याचे दृश्य—साहित्यिक वाद

कलकत्त्याला गालिब पोहचल्यानंतर लवकरच कलकत्ता कॉलेजच्या साहित्य-मंडळाने एक कविसंमेलन भरवले. गालिबने त्यात भाग घेतला व त्या

प्रसंगी आपले दोन फारशी गजल म्हटले. कलकत्त्यातील बहुतेक कवी हे एकतर महंमद हसन ‘कातील’चे शिष्य, किंवा त्याचे उत्कट चहाते तरी होते. गालिबने जेव्हा आपली कविता म्हटली, तेव्हा ‘कातील’च्या आधारावरून त्याच्यावर प्रतिकूल टीका झाली. भारतातील फारशी विद्वानांना गालिबने कधीच फारसे लेखले नव्हते. कोणतीही भाषा परिश्रमाने व कठिण अभ्यासाने शिकता येते व तीत प्रावीण्यही मिळवता येते, असे त्याचे म्हणणे. पण तिचा अचूक प्रयोग व वाक्प्रचार कोणता असा प्रश्न उद्भवला तर केवळ त्या विशिष्ट देशातील लोकांचा किंवा त्यांच्या लेखनाचाच दाखला पुराव्यासाठी देता येईल, असे त्याने ठासून सांगितले. त्या देशाबाहेरचे लोक, मग ते कितीही मोठे विद्वान असोत, त्यांचा शब्द या बाबतीत अखेरचा मानता येणार नाही. ‘कातील’ हा भारतीय असल्यामुळे त्याने वापरलेला विशिष्ट शब्द बरोबर आहे की नाही हे ठरविण्यासाठी, त्याच्या मते, अधिकारी म्हणून ‘कातील’चा दाखला देता येत नाही. वस्तुतः त्याने ‘कातील’बद्दल अपमानास्पद शब्द उच्चारले. त्यामुळे फारशीचा कवी व पंडित म्हणून ‘कातील’बद्दल नितांत आदर असलेला श्रोतृवर्ग संतापला. गालिबभोवती टीकेची वावटळच उठली. लोकांच्या विरोधी आक्षेपांना व टीकेला त्याला तोंडी व लेखी असा दुहेरी सामना द्यावा लागला. त्यामुळे लोकांचा विरोध ओसरला, पण पूर्णपणे कधीही शमला नाही. त्या दुर्दैवी घटनेचा त्याच्या साहित्यिक जीवनावर कायमचा परिणाम झाला व जसजसा काळ गेला तसतशी भारतातील फारशी विद्वानांबद्दलची त्याची कटुता अधिकच तीव्र होत गेली.

## कलकत्ता : सांस्कृतिक प्रभाव

या कलकत्ता-प्रवासाचा आणखी एक परिणाम म्हणजे त्याच्या जीवन-दृष्टीवर पडलेला त्याचा निरामय प्रभाव. त्या काळी कलकत्ता हे भारतातील सर्वांत सुधारलेले शहर होते. ब्रिटिशांच्या कारकीर्दीची सुरुवात झाल्यामुळे अत्याधुनिक व अद्यावत शास्त्रीय शोध सर्वसामान्य झाले होते. कलकत्ता बंदरात सदैव गजबज असे. दूरदूरच्या देशांतला माल वाहून आणणाऱ्या

कोटी जगाच्या कानाकोपऱ्यांतून तेथे येत. कलकत्त्यात राहणाऱ्या इंग्लिश समाजानेच खुद्द स्थिर व सुस्त पौर्वात्य वातावरणात फार मोठा बदल घडवून आणला होता. १९ व्या शतकाच्या सुरवातीला स्थापन झालेल्या फोर्ट विलियम कॉलेजने कित्येक मूळ उर्दू ग्रंथ व इंग्रजीतून आणि काही पौर्वात्य भाषांतून केलेली उर्दू भाषांतरे छापली होती. त्यांनी उर्दू गद्यात एक नवी शैली प्रचारात आणली. कलकत्त्यात इराणी लोकांची आणि प्रवाशांची फार मोठी वस्ती होती. गालिब त्यांच्या निकट सहवासात आला व त्यामुळे त्याला आधुनिक फारशी भाषा शिकता आली. या सर्व गोष्टी एकत्रित होऊन साहित्यासंबंधीच्याच केवळ नव्हे तर सामाजिक, राजकीय व आर्थिक जीवनाबद्दलच्या त्याच्या दृष्टिकोनात परिवर्तन झाले.

अशा प्रकारे, ज्या मूळ हेतूने त्याने हा दीर्घ व कटकटीचा प्रवास पत्करला होता त्यात त्याला अपयश आले, तरी बौद्धिक दृष्ट्या व सामान्य ज्ञानाच्या दृष्टीने बरेच काही मिळवले, असे दिसेल. फारशीच्या प्रभावामुळे उर्दू गद्य अद्याप बोजड आणि फारशी वाक्प्रचारांनी व परिभाषेने ओतप्रोत भरलेले असे. हे अगदी स्वाभाविक होते. त्या काळच्या बहुतेक उर्दू लेखकांचे शिक्षण फारशीत होई व जरी परिस्थितीच्या दडपणाखाली त्यांनी उर्दूत लिहायला सुरुवात केली होती, तरी या नवीन भाषेबद्दलचा त्यांचा आदर जेमतेम होता. त्यांचे बहुतेक लिखाण फारशीतच केले जाई व आविष्काराचे माध्यम म्हणून जरी उर्दूचा वापर करण्याची ते कृपा दाखवीत, तरी त्यांना आपली फारशी पार्श्वभूमी झटकून टाकता येत नसे. फोर्ट विलियम कॉलेज ही उर्दू गद्यात नवी मळवाट घालून देणारी पहिली संस्था. तिचा मूळ उद्देश, इंग्लंडातील ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरीत शिरून शासकीय यंत्रणेचा भाग म्हणून भारतात येणाऱ्या आपल्या तरुण नोकरांसाठी (रायटर्स) योग्य क्रमिक पुस्तके पुरविण्याचा होता. जनसामान्यांच्या व्यवहाराचे माध्यम असलेली उर्दू त्यांना शिकावीच लागे. लॉर्ड वेलेस्लीने या कॉलेजची स्थापना केली. तेथे इंग्लंडातून नवीनच आलेल्या लेखकांना उर्दू शिकवले जाई. क्रमिक पुस्तके तयार करण्यासाठी देशाच्या विभिन्न भागांतील कवी व लेखक हे फारशी व

अरबी पुस्तकांचे भाषांतर करण्यासाठी किंवा मूळ पुस्तके लिहिण्यासाठी कामास ठेवण्यात आले होते. या लिखाणाची भाषा साधी व बोलभाषेला निकटची असावी लागे. गालिबने यांतली काही पुस्तके वाचली होती, असा निर्देश मिळतो. असे मत व्यक्त करण्यात आले आहे की, अभिजात फारशी व उर्दू भाषेत त्या काळच्या सामान्यतः रूढ पद्धतीनुसार दमछाक करणाऱ्या पल्लेदार प्रास्ताविकाशिवाय एकदम विषयाला हात घालणारी पत्रलेखनाची जी इंग्रजी शैली होती तिने गालिब प्रभावित झाला होता. पण हे बरोबर नाही. कलकत्त्याला जाण्यापूर्वीच, आपले सर्व लेखन फारशीत करीत असताना गालिबने या लेखन-पद्धतीविरुद्ध मत व्यक्त केले होते व त्या काळच्या रूढ शिष्टाचाराची अनावश्यक बंधने झुगारून देण्याबद्दलची आपली आवड दाखवून दिली होती. पण फोर्ट विलियम कॉलेजने निर्माण केलेले साधे व सुटसुटीत गद्य त्याला पोषक ठरले व दुसरे काही नसले तरी त्याने त्याचे पूर्वीचे मत अधिक दृढ केले, हे खरे आहे.

सुमारे तीन वर्षांच्या गैरहजेरीनंतर गालिब १८२९ च्या फेब्रुवारीअखेर दिल्लीस पोचला.

## शमसुद्दीन अहमद खानाची शोकांतिका

दिल्लीच्या त्याच्या गैरहजेरीत घटना वेगाने घडल्या होत्या. पूर्वी सांगितल्याप्रमाणे, नवाब अहमद बक्ष खान १८२७ च्या डिसेंबरात निधन पावला होता. नवाब शमसुद्दीन खान आता फिरोजपूर झरका व लोहारू या दोन संस्थानांच्या गादीवर स्थिर झाला होता. त्याचे त्याच्या दोघा धाकट्या भावांशी असलेले भांडण आणखीच ताणले गेले होते. आणि त्यांच्या वडिलार्जित वारशाच्या उपभोगापासून त्यांना वंचित ठेवून त्याने त्या दोन तरुण पोरांच्या मार्गात अडथळे आणायला सुरवात केली होती. गालिबने खटला भरल्यामुळे फिरोजपूरच्या खजिन्यातून त्याला मिळणारे पेन्शनही अजिबात बंद करण्यात आले. त्यावर वरताण म्हणजे मिस्टर विलियम फ्रेझर या ब्रिटिश एजंटशी त्याचे गंभीर मतभेद निर्माण झाले होते.

त्याचे फार दुर्दैवी परिणाम झाले. २२ मार्च १८३४ रोजी रात्री एक खाना आटोपून फ्रेझर काश्मीरी गेटाबाहेर रिजवर असलेल्या आपल्या घरी परत येत असता, त्याच्यावर गोळी घालण्यात आली. त्यानंतर झालेल्या चौकशीत नवाबाचा करीम खान नावाचा एक नोकर पकडला जाऊन त्याच्यावर खुनाचा आरोप लावण्यात आला. पुढील चौकशीत नवीन गोष्टी उजेडात आल्या. त्यावरून गुन्ह्यात खुद्द नवाबाचाच हात असल्याचे दिसले. परिणामी दोघांनाही चौकशीसाठी कोर्टात खेचण्यात आले. प्रत्यक्ष खुनी माणसाला २६ ऑगस्ट १८३५ ला फाशी देण्यात आले. त्याच वेळी चौकशी करणाऱ्या न्यायाधिशाने या खटल्याचा संपूर्ण अहवाल कलकत्त्याला गव्हर्नर जनरलला पाठवून शिफारस केली की या गुन्ह्यास प्रवृत्त करण्याबद्दल नवाबालासुद्धा तोच दंड द्यावा. ही महान आपत्ती टाळण्यासाठी नवाबाने हरप्रयत्न केले, पण ते विफल ठरले. गव्हर्नर जनरलने दिल्लीच्या न्यायाधिशाची शिफारस मान्य केली व सरतेशेवटी नवाबाला सुद्धा ८ ऑक्टोबर १८३५ रोजी फासावर चढवण्यात आले.

या घटनेने परिस्थिती आमूलाग्र बदलली. ब्रिटिशांनी मुळात अहमद बक्ष खानाला देणगी दिलेले फिरोजपूर झरक्याचे राज्य परत घेतले. पण अलवारच्या महाराजाने दिलेले लोहारू संस्थान मात्र त्या घराण्याकडेच राहिले. शमसुद्दीन खानाचा धाकटा भाऊ अमीनुद्दीन अहमद खान लोहारूचा नवाब बनला व इस्टेटीत भागीदार असलेल्या झियाउद्दीन अहमद खान या त्याच्या धाकट्या भावाला संस्थानाच्या एकूण उत्पन्नाचा अर्धा भाग दिला जावा असा आदेश त्याला दिला गेला. यापुढे गालिबला पेन्शन देण्याचे काम दिल्लीच्या कलेक्टर कचेरीकडे सोपविले गेले.

या दरम्यान, आपले पेन्शन सालाना १०००० रु. वाढावे म्हणून गालिबने केलेला अर्ज बरखास्त करण्याच्या गव्हर्नर जनरलच्या निर्णयाविरुद्ध गालिबने केलेले अपील चालू होते. ते शेवटी १८४२ मध्ये इंग्लंडमधील गृहमंत्रालयाकडून फेटाळण्यात आले. झालेले नुकसान थोडेफार भरून काढण्याचा गालिबने त्यानंतर सुद्धा प्रयत्न केला, पण ते सर्व व्यर्थ ठरले. सरतेशेवटी १८४४ मध्ये त्याने पराभव पत्करला.

खटल्याच्या सुरवातीला त्याने ज्या अनेक मागण्या केल्या होत्या, त्यांपैकी आपले पेन्शन फिरोजपूर झरका संस्थानामार्फत न मिळता ब्रिटिश खजिन्यातून मिळावे ही एक होती. ती आपोआप स्वीकारण्यात आली. कारण आता तो नवाब किंवा ते संस्थानही अस्तित्वात नव्हते. शिवाय, गव्हर्नर जनरलच्या स्वागत-समारंभात उपस्थित राहण्याचा मान व दरबारात तो जेव्हा हजर राहील तेव्हा मानाचा पोशाख मिळावा अशी विनंती त्याने केली होती. पहिली विनंती तो कलकत्त्याला असतानाच लॉर्ड विलियम बेंटिंकच्या कारकीर्दीत मान्य करण्यात आली. मानाचा पोषाख खटला संपण्याच्या सुमारास लॉर्ड एलनबरोच्या काळात (१८४२-४४) त्याला बहाल करण्यात आला.

सतत १५ वर्षे चाललेल्या ह्या लांबलचक खटल्याने गालिबच्या तुटपुंज्या उत्पन्नावर फार मोठा ताण पडला. खर्च भागवण्यासाठी त्याला भरमसाट व्याजाच्या दराने कर्ज घ्यावे लागले व ते फेडण्यासाठी पुढे त्याला फार हालअपेष्टा भोगाव्या लागल्या.

## मोंगल दरबाराशी संबंध

गालिबची आर्थिक स्थिती यावेळी हलाखीची होती, तरी देशाच्या साहित्यिक वर्तुळात त्याने अगोदरच उच्च स्थान प्राप्त केले होते. मोंगल दरबारात त्याचा प्रवेश कसा झाला हे दाखवणारा प्रत्यक्ष पुरावा उपलब्ध नाही. आग्र्याहून दिल्लीला तो आला त्यावेळी लाल किल्ल्यातील शाही तख्तावर दुसरा अकबरशहा होता. दिल्लीला त्याचे आगमन झाल्यावर, तो बहुधा नवाब अहमद बक्ष खानाच्या कुटुंबात राहिला असावा. नवाबाचा शाही दरबाराशी केवळ परिचयच नव्हता. तेथे तो कोणत्यातरी महत्त्वाच्या पदावरही असला पाहिजे. म्हणून राजदरबारात गालिबचा प्रवेश नवाबाच्या मार्फतच झाला असेल, हे बिनधोकपणे गृहीत धरायला हरकत नाही. सुरवातीला त्याने बादशहाचा अनुग्रह संपादण्याचा प्रयत्न केला. त्याच्या फारशी 'दिवाणा'त दुसऱ्या अकबराच्या स्तुतीप्रीत्यर्थ रचलेला एक 'कसीदा' (स्तुतिगीत) आपणांस आढळतो. त्यात शाहजादा सलीमचा

युवराज म्हणून त्याने उल्लेख केला आहे, पण हा प्रयत्न अयशस्वी झाल्याचे दिसते. दुसऱ्या अकबरशहाने थोडीफार कविता रचली होती, तरी कला वा साहित्याबद्दल त्याला प्रेम नव्हते. त्यामुळे त्याच्यावर गालिबची काही मात्रा चालली नाही. अकबरशहा १८३७ मध्ये वारला व त्याच्यामागून दुसरा बहादुरशहा गादीवर आला. हा नवा बादशहा उर्दू भाषेत तज्ज्ञ होता. एवढेच नव्हे तर वैशिष्ट्यपूर्ण कवी म्हणून उर्दू साहित्यात कायमचे स्थान त्याला देता येईल. 'जफर' या टोपणनावाने तो लिहीत असे. दुर्दैवाने त्याच्याही दरबारात गालिबचा प्रवेश होऊ शकला नाही. लहानपणापासून, त्याला गादी मिळण्याची कोणतीच शक्यता नसल्यामुळे, वेळ घालवण्यासाठी 'जफर' कविता लिहीत असे. सुरवातीला सुप्रसिद्ध उर्दू कवी नसीर त्याचा मार्गदर्शक व गुरू होता. महाराजा चंदूलालच्या निमंत्रणावरून जेव्हा नासीर हैदराबादला (दख्खन) निघून गेला, तेव्हा काही काळ 'जफर'ने कुणा कासीम अली 'बेकरार'चा सल्ला घेतला. हा संबंध सुद्धा फार काळ टिकला नाही. १८०८ मध्ये 'बेकरार' सुद्धा माउंटस्टुअर्ट एल्फिन्स्टनबरोबर भाषांतरकार म्हणून वायव्य सरहद प्रांताकडे निघून गेला. एल्फिन्स्टनला ब्रिटिशांनी काबूलच्या अमीराशी बोलणी करून तह करण्यासाठी पाठविले होते. 'बेकरार' गेल्यावर जफर तत्कालीन साहित्य-विश्वात झपाट्याने आघाडीवर येणाऱ्या महंमद इब्राहीम जौक या तरुण कवीकडे वळला.

यावरून असे दिसेल की, दरबारात चंचुप्रवेश करण्यासाठी गालिबला खुला असलेला एकमेव मार्ग तो दिल्लीला येण्यापूर्वीच बंद झालेला होता. नंतरच्या काळात बादशहाचा अनुग्रह संपादन करण्याचा जर त्याने प्रयत्न केला असता, तर जौक आणि त्याचे साथी यांनीच त्याला विरोध केला असता असे नव्हे, तर दुसरा अकबरशहा आणि त्याचा मुलगा सलीम यांच्या स्तुतीप्रीत्यर्थ त्याने लिहिलेला 'कसीदा' ही त्याच्या मार्गातली मोठीच धोंड ठरली असती, कारण त्या दोघांनीही जफर तख्तनशीन होण्याविरुद्ध कारवाया केल्या होत्या.

स्वतःची योग्यता व महती यांबद्दल गालिबला तीव्र जाणीव होती, जौकसारख्या कवींनी व त्याच्या टोळक्याने केलेल्या या पराभवाने त्याचे

पित्त बरेच भडकले असावे. त्याचे जीवन म्हणजे दुर्दैवाविरुद्ध दिलेला अखंड लढा. त्याचे वडील व त्याच्यानंतर त्याचे काका फार लौकर त्याच्या बालवयातच वारले. त्यामुळे त्याच्या आयुष्यात असुरक्षिततेचा दीर्घकाळ सुरू झाला व खुद्द जगण्यासाठीच त्याला दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहावे लागले. जेव्हा तो वयात आला, तेव्हा त्याचे व त्याच्या कुटुंबाचे न्याय्य हक्क लुबाडण्यात आल्याचे त्याला आठवले. ते मिळवण्यासाठी त्याला दीर्घकालीन खटला चालवावा लागला व शेवटी फार मोठी किंमत देऊन त्यात हार खावी लागली. अशा प्रकारचा अन्याय चालू देणाऱ्या समाजाविरुद्ध त्याच्या मनात बंडखोरपणाची भावना निर्माण होणे अगदी सहज आहे.

अशा प्रतिकूल आर्थिक परिस्थितीत एखाद्याच्या बौद्धिक व नैतिक क्षमतेबद्दल जर योग्य मान्यता मिळाली तर त्याला भरपाई झाल्याचे समाधान मिळते. दुसऱ्या बहादुरशहाचा दरबार किती का लहान व क्षुल्लक असेना, परंतु ही मान्यता देऊ शकणारे ते एकमेव स्थान होते. पण ती सुद्धा त्याला नाकारण्यात आली. कारण त्या ठिकाणी तो उशिरा पोचला होता. म्हणून त्याच्या मनात समकालीन साहित्यिक जगाबद्दल तुच्छतेची भावना निर्माण झाल्याबद्दल आश्चर्य वाटत नाही. ही गोष्ट अखेर त्याच्या सामर्थ्याचे तसेच दौर्बल्याचे मूलकारण बनली; सामर्थ्याचे कारण यामुळे की अनुग्रहासाठी इतरांच्या तोंडाकडे पाहण्याचे त्याने बंद केले, व दौर्बल्याचे कारण अशासाठी की प्रतिकूल परिस्थितीशी जुळवून घेणे त्याला जमले नाही.

## उर्दू 'दीवाण'

राजदरबारात सरकारी मान्यता मिळण्यात त्याला निःसंशय अपयश आले होते. तरी सुद्धा त्याची योग्यता ओळखणारे आणि एक थोर कवी व लेखक म्हणून त्याचा गौरव करणारे लोक होते. त्याचे महत्त्व सतत वाढत गेले आणि परिश्रमाने व चिकाटीने त्याने विद्वानांचा व जाणकारांचा एक गट आपल्या बाजूस वळवला. एका मित्राच्या सांगण्यावरून त्याने आपला उर्दू 'दीवाण' दुरुस्त केला आणि ज्या कविता दुर्बोध किंवा रचनेत सदोष होत्या त्या त्याने

वगळून टाकल्या. १८४१ मध्ये त्याचा उर्दू 'दीवाण'–सुमारे ११०० शेर असलेले एक बारके चोपडे–प्रथमच प्रसिद्ध झाले.

त्यानंतर लौकरच १८४५ मध्ये त्याचा फारशी 'दीवाण' प्रकाशित झाला. हा जास्त मोठा असून त्यात सुमारे ६७०० शेर होते. या दोन ग्रंथांच्या प्रकाशनाने उर्दू व फारशीचा कवी म्हणून त्याची कीर्ती प्रस्थापित झाली आणि आता त्याच्या मित्रांना तद्वतच शत्रूंनाही त्याच्या सामर्थ्याची दखल घ्यावी लागली. १८४७ साली त्याच्या 'उर्दू 'दीवाण'ची दुसरी आवृत्ती काढावी लागली, यावरून साहित्यिक वर्तुळात त्याची लोकप्रियता किती जलद वाढत होती हे दिसते.

## आर्थिक चणचण

महान कवी म्हणून मान्य होणे वेगळे, आणि आरामात राहता येणे वेगळे. गालिब नेहमीच आपल्या ऐपतीबाहेर राहात आला होता. जोपर्यंत त्याची आई जिवंत होती, तोपर्यंत तिने त्याला पैशाची मदत केली. ती केव्हा वारली याबद्दल खात्रीपूर्वक सांगता येत नाही, पण ही दुःखद घटना १८४० साली घडली असावी असे म्हणायला परिस्थितिजन्य पुरावा आहे. त्यानंतर उत्पन्नाचे हे साधन नाहीसे झाले. नवाब अहमद बक्ष खान १८२७ साली वारला व तो जी काय मदत करीत असे तीही त्यानंतर बंद झाली. दीर्घकालीन कर्जबाजीने त्याची बचत पार संपली आणि खरे तर त्याच्या कर्जात आणखीच भर पडली. म्हणून त्याची विवंचना दूर करण्यास जास्तीचे उत्पन्न मिळवण्यासाठी उपाय शोधणे त्याला व त्याच्या मित्रांना अत्यंत आवश्यक वाटत होते.

## दिल्ली कॉलेजची घटना

१८४० मध्ये अशी संधी चालून आली. परंतु गालिबने तिचा फायदा घेतला नाही. दिल्ली कॉलेजचा निरीक्षक जेम्स टॉमसन हा कॉलेजच्या दौऱ्यावर आला असता कॉलेजात फारशी भाषा शिकवण्याची सोय समाधानकारक

नाही असा शेरा त्याने दिला आणि ही उणीव भरून काढावी अशी शिफारस केली. कुणीतरी त्याला सुचविले की दिल्लीत फक्त तीनच फारशी भाषा-तज्ज्ञ आहेत : गालिब, सुप्रसिद्ध उर्दू कवी मोमीन व विख्यात फारशी पंडित इमाम बक्ष साहबई; आणि हे काम स्वीकारण्याबद्दल तिघांपैकी कुणाचेही मन वळवता येईल. त्यानुसार टॉमसनने सर्वप्रथम गालिबला भेटीसाठी बोलाविले. भारत सरकारचा सचिव या नात्याने टॉमसनची गालिबशी पूर्वीचीच ओळख होती. आणि सरकारी दरबारप्रसंगी 'खुर्चीनशीन' असण्याचा मान गालिबला असल्यामुळे त्याच्याकडे टॉमसनचे येणेजाणेही होते. टॉमसनच्या विनंतीनुसार गालिब नेहमीप्रमाणे 'पालखी'तून त्याच्या निवासस्थानी गेला. तेथे पोचल्यावर त्याचे स्वागत करायला कुणीतरी सामोरे येईल म्हणून फाटकाशीच वाट पाहात तो थांबला. गव्हर्नर जनरलच्या आमंत्रित दरबारात उपस्थित राहण्याच्या मानाचा अधिकारी असलेला माणूस एरवी भेटायला आल्यास त्याच्या स्वागताची हीच प्रथा रूढ होती. यापूर्वी गालिब टॉमसनला जेव्हा कधी भेटायला जाई त्या त्या प्रसंगी टॉमसन बहुधा तसे वागत असावा. परंतु या वेळीं गालिब वाट पाहात राहिला तरी कोणीच त्याच्या स्वागतार्थ पुढे आले नाही. काही वेळानंतर, गालिब उतरून घरात का येत नाही याची चौकशी करण्यासाठी टॉमसन स्वतःच बाहेर आला. ही अडचण त्याला सांगितल्यावर टॉमसनने सांगितले की गालिब सरकारी मुलाखतीसाठी आला असता तरच त्याचे औपचारिक स्वागत करता आले असते. पण यावेळी दिल्ली कॉलेजात नोकरी मिळवण्यासाठी तो भेटायला आला असल्यामुळे नेहमीप्रमाणे रूढ सन्मान मिळवण्याचा त्याला अधिकार नाही. यावर गालिबची अतिशय तीव्र प्रतिक्रिया झाली. त्याने ताडकन उत्तर दिले की दिल्ली कॉलेजातील पदासाठी तो टॉमसनला भेटायला आला होता तो आपल्या देशबांधवांच्या, तसेच ब्रिटिश सरकारच्या अधिकाऱ्यांच्या नजरेत त्याच्या प्रतिष्ठेत भर पडेल व त्याच्याविषयीचा आदर वाढेल या आशेने, त्यांच्या लेखी अवमानित होण्यासाठी नव्हे. हे पद स्वीकारणे म्हणजे त्याला मिळत असलेला मान गमावण्यासारखे असेल, तर त्यापेक्षा ते नाकारणेच अधिक

श्रेयस्कर. असे म्हणून तो पालखीकडे परतला व सरळ घरी निघून गेला. या घटनेने त्याच्या मूळ स्वभावावर भरपूर प्रकाश पडतो. वयाच्या नवव्या वर्षापासून, म्हणजे १८०६ साली त्याचे काका वारले तेव्हापासून, त्याला ब्रिटिशांकडून पेन्शन मिळत होते. सहकारी दरबारात हजर राहताना प्रत्येक-वेळी अधिष्ठात्या पदाधिकाऱ्याच्या स्तुतीप्रीत्यर्थ तो एक 'कसीदा' लिहीत असे व बहुधा म्हणतही असे. फारशी भाषेचा तज्ज्ञ व महापंडित असल्याचा त्याचा दावा होता. आणि सर्वांत महत्त्वाचे म्हणजे त्याची आर्थिक परिस्थिती अत्यंत ओढगस्तीची होती. कुणालाही साधारणतः वाटेल की ही संधी तो गमावणार नाही आणि ही कॉलेजातील नोकरी धरील. त्याने त्याचे ब्रिटिश आश्रयदाते खूष झाले असते आणि फारशीचा पंडित म्हणून त्याला मान्यता मिळून, त्याच्यामागच्या आर्थिक काळज्यांचा ससेमिराही चुकला असता. परंतु हे सर्व फायदे उघड दिसत असूनही परिणामांची पर्वा न करता हट्टीपणाने त्याने ही नोकरी लाथाडली. ती निव्वळ एवढ्यासाठीच की, टॉमसनच्या घरी तो गेला असता, त्याचे स्वागत करण्यास तो चुकला. यावरून त्याची उपजत स्वाभिमानाची आणि आत्मगौरवाची जाणीव दिसून येते व तिची जपणूक तो अत्यंत कटाक्षाने करी.

## जुगाराबद्दल तुरुंगवास

आत्मसन्मान व स्वाभिमान वगैरे गोष्टी ठीक होत्या, पण त्यांनी त्याच्या आर्थिक समस्या सुटू शकल्या नाहीत. त्या सदैव होत्या तशाच राहिल्या. अगदी तरुण वयापासूनच थोडे पैसे लावून बुद्धिबळ व चौसर खेळण्याची त्याला सवय होती. या तंगीच्या दिवसांत अधिक करून खेळायला त्याने सुरवात केली असे दिसते. यात गावातील काही धनिक व्यापाऱ्यांची त्याला साथ मिळाली आणि ते जुगार खेळण्यासाठी त्याच्या घरी नेमाने जमायला लागले. उघडच, याची काही प्रमाणात त्याला मदत झाली. गावात जुगारीचा सुळसुळाट माजला आहे हे पोलिस अधिकाऱ्यांना ठाऊक होते आणि समाजाला आतून पोखरून टाकणाऱ्या या दुर्व्यसनाचा नायनाट त्यांना करायचा

होता. दररोज कोणत्या ना कोणत्या जुगारअड्डयावर त्यांची धाड येत असे आणि जुगाऱ्यांना पकडून शिक्षा फर्मावली जाई. गालिबला आतापर्यंत कोतवालाकडून संरक्षण मिळत गेले. तो त्याचा व्यक्तिगत मित्र आणि साहित्याचा चाहता होता. पण त्यावेळी त्याची बदली झाली होती आणि त्याच्या जागी आलेल्या कुणा फैझुल हसन खान नामक नव्या पोलिस-इन्स्पेक्टराला साहित्यात तर गम्य नव्हतेच, परंतु आपले कर्तव्य काटेकोरपणे बजावण्यात तो चोख होता. गावातील हे दुराचार नाहीसे करण्याची जबाबदारी त्याने आपल्या अंगावर घेतली. एके दिवशी भेटीला आलेल्या बायकांचे सोंग घेऊन त्याने गालिबच्या घरावर हल्ला केला. चारीकडून झाकलेल्या पालख्यांतून काही पोलिस खानाने बसवले. जणू काय काही पडदानशीन बायकाच गालिबच्या घरी बसायला आल्या होत्या. गालिब आणि त्याची मित्रमंडळी जुगार खेळण्यात दंग होती. जेव्हा पोलिस आत पोचले, तेव्हा त्यांनी जुगाऱ्यांना मुद्देमालासकट पकडले आणि जागच्या जागीच अटक केली. अर्थातच त्याला थोडाबहुत प्रतिकार करण्यात आला, पण तो व्यर्थ ठरला. त्यांच्यापैकी धनिक व्यापारी आपले वजन व पैसा खर्ची घालून कसेतरी निसटले. पण गालिबला तो स्वतःच यजमान असल्यामुळे घरात जुगारअड्डा बसवल्याच्या आरोपावरून अटक झाली. मॅजिस्ट्रेटसमोर त्याला हजर करण्यात आले आणि कायद्याविरुद्ध अड्डा बसवल्याबद्दल त्याच्याविरुद्ध मुकदमा चालवला गेला. त्याच्या मित्रांनी त्याला सोडवण्यासाठी हरप्रयत्न केले. फार काय बादशहानेसुद्धा मध्यस्थी केली, तरीदेखील त्याला शेवटी २०० रु. नगद दंडासह सहा महिने सक्तमजुरीची शिक्षा ठोठावण्यात आली. ती या अटीसह की जास्तीचे ५० रु. भरल्यास कारावास 'सक्त'ऐवजी 'साधा' करण्यात येईल व जर दंड अजिबात भरला नाही तर त्याची मुदत एक वर्षापर्यंत वाढवण्यात येईल. तथापि, गालिबने सहा महिन्यांची पूर्ण मुदत काही तुरुंगात काढली नाही व दिल्लीचा सिव्हिल सर्जन डॉ. रॉस याच्या शिफारसीवरून तीन महिन्यांनंतरच त्याची सुटका करण्यात आली.

या तुरुंगवासाने गालिबच्या स्वाभिमानाला जबर तडाखा बसला. दंडाची

रक्कम भरली गेल्यामुळे हा तुरुंगवास म्हणजे फक्त 'साधी' कैद होती. त्याचा सामाजिक व साहित्यिक दर्जा ठाऊक असलेल्या अधिकारी वर्गाने त्याला अतिशय उदारपणे वागवले. त्याचे सारे हवे-नको घरूनच होत असे व मित्र-मंडळीच्या भेटीगाठीवरही कोणतेच निर्बंध घातलेले नव्हते. तरी सुद्धा हा तुरुंगवास एका नैतिक गुन्ह्याबद्दल भोगावा लागला होता व या गोष्टीने मित्रांच्या व लोकांच्या नजरेतून तो उतरल्याशिवाय राहिला नसता. म्हणूनच ही दुर्दैवी घटना त्याच्या फारच जिव्हारी लागली. सामान्य समाज अशा घटनांबद्दल कधीच क्षमा करू शकत नसे व गुन्हेगारांची, मग त्यांचा गुन्हा काही का असेना, अवहेलना करी. याचा परिणाम असा झाला की या शिक्षेबद्दलच्या तीव्र वेदनेने गालिब दीर्घकाळ तडफडत राहिला आणि एकदा तर, घडलेल्या गोष्टीबद्दल लोक त्याचे हसे करणार नाहीत किंवा उपहास करणार नाहीत अशा कुठल्यातरी दुसऱ्या देशात दूर निघून जावे असेही त्याच्या मनाने घेतले.

तथापि त्याच्या दृष्टीने जी मानहानी होती, तीच साहित्याच्या दृष्टीने वरदान ठरली. कारावासात असताना त्याने एक दीर्घ फारशी कविता रचली. ही कविता म्हणजे त्याच्या मनोविचारांचे व भावनांचे चित्रण होय. तीत त्याने आपल्या दुर्दैवाबद्दल शोक व्यक्त केला असून आपल्या कमनशिबाला, आणि त्याची थोरवी विसरून गावातील चोर-भामट्यांसह त्याला तुरुंगात डांबून यातना भोगायला लावणाऱ्या समाजाला, शिव्याशाप दिले आहेत. त्याच्या आपत्काली साथ देणाऱ्या मित्रांना, विशेषतः त्याचा जिवलग मित्र नवाब मुस्तफा खान 'शेफ्ता' या एका उमरावाला, त्याने अतिशय वाखाणले आहे. 'शेफ्ता' हा उर्दू व फारशीचा कवी असून फारशी काव्याच्या बाबतीत तो गालिबचा सल्ला घेत असे. त्याच्या फारशी भाषेच्या ज्ञानाबद्दल तसेच त्याच्या गुणांबद्दल तो गालिबची अतिशय प्रशंसा करी. गालिबच्या अटकेची वार्ता मिळताच त्याची सुटका करण्यासाठी त्याने आपले वजन खर्ची घालण्याचा प्रयत्न केला. परंतु या प्रयत्नांत त्याला अपयश आले. गालिबवर खटला होऊन त्याला कारावासाची शिक्षा झाली.

'शेफ्ता'ने खटल्याचा खर्च भरून काढण्यातही त्याला साह्य केले. गालिब तुरुंगात असेतो एक दिवस आड तो त्याला भेटायला जात असे व कारावासाचे दुःख कमी करण्यासाठी त्याच्याबरोबर तो जास्तीत जास्त वेळ राही. त्याच्या संकटकाळी 'शेफ्ता'ने दाखविलेल्या उत्कट सहानुभूतीबद्दल व त्याच्या अढळ निष्ठेबद्दल गालिबने या कवितेत त्याची फार प्रशंसा केली आहे.

## शाही इतिहासकार

तुरुंगातून सुटका झाल्यावर गालिब काही काळ दुसऱ्या बहादुरशहाचा धर्म-गुरू मौलाना नासिरुद्दीन खान ऊर्फ मियां काले साहेब याच्याकडे राहिला. तो विपन्नावस्थेत होता हे त्याच्या सर्व मित्रांना ठाऊक होते. अडचणीवर मात करता यावी म्हणून त्याच्यासाठी कायमचे उत्पन्नाचे साधन मिळवून देणे आवश्यक होते. बहादुरशहाचा मंत्री व राजवैद्य अहसनुल्ला खान हा साहित्याचा मोठा आश्रयदाता व गालिबचा मित्र होता. त्याने व नासिरुद्दीन खानाने संगनमत करून त्याच्या वतीने बहादुरशहाजवळ शब्द टाकण्याचे ठरवले. परिणामी १८५० च्या जुलैच्या सुरवातीलाच बादशहाने गालिबला फारशी भाषेत तैमूर राजवंशाचा इतिहास लिहिण्याचा हुकूम दिला व त्याबद्दल सालाना ६५० रु. रक्कम मंजर केली. शिवाय मानाचा दरबारी पोशाख व 'नज्मुद्दौला दबिरुलमुल्क, निजामे जंग' ही पदवीही त्याला बहाल करण्यात आली. अशा प्रकारे एक विवक्षित काम व निश्चित वेतन मिळून गालिब मोंगल राजदरबाराचा सेवक बनला. त्याचबरोबर आधारभूत ऐतिहासिक साहित्य गोळा करून गालिबला पुरवण्याचा अहसनुल्ला खानाला आदेश देण्यात आला. त्याचाच पुढे गालिबने फारशी अनुवाद करायचा होता. हे काम १८५७ पर्यंत, म्हणजे 'शिपायांचे बंड' म्हणून ओळखला जाणारा महान राजकीय उत्पात घडून आला तोपर्यंत, चालू राहिले. गालिबने दोन खंडांत हा इतिहास पुरा करण्याचे ठरवले होते. पहिला तैमूरपासून हुमायूनपर्यंत, व दुसरा अकबरापासून दुसऱ्या बहादुरापर्यंत. फारशी अनुवादासाठी भिन्नभिन्न ठिकाणांहून सामुग्री निवडून ती गोळा करण्याचे

काम हसनुल्ला खानावर सोपविण्यात आले होते. ते त्याला नियमितपणे पार पाडता आले नाही, तसेच इतर कामाची लफडीही त्याच्यामागे होती. त्यामुळे पहिल्या खंडाचेच काम कित्येक वर्षे रेंगाळत राहिले व शेवटी कसे-बसे पुरे झाले. दुसऱ्या खंडाचा मजकूर अजीबातच हाती आला नाही असे दिसते. या कामाच्या प्रगतीत कुणालाच स्वारस्य नाही असे दिसून आल्या-मुळे गालिबही थोडा मंदोत्साह झाला आणि त्याने अहसनुल्लाला मजकूर पुरविण्यास सांगितले नाही. परिणामी, दुसऱ्या खंडाचे संकलन कधीच झाले नाही. या इतिहासाचा पहिला भाग लाल किल्ल्यातील शाही छापखान्यातून १८५४ साली 'मेहरे नीमरोज' या शीर्षकाने प्रसिद्ध झाला.

यानंतर काही काळ सुखासीनतेत गेला. बादशहाचा साहित्यिक सल्लागार महंमद इब्राहिम झौक नोव्हेंबर १८५४ मध्ये वारला. बादशहा व त्याच्या-बरोबर त्याचा वारसदार मिर्झा फकरुद्दीन हा सुद्धा आता गालिबचा सल्ला घेऊ लागला. गालिबच्या सेवेबद्दल मिर्झा फकरुद्दीन त्याला सालाना ४०० रु. देऊ लागला. असे दिसते की अयोध्येचा शेवटचा राज्यकर्ता वाजिद अली शाह यानेही वर्षासन देऊन गालिबला आश्रय दिला होता. उघडच, गालिबला सुटकेचा विश्वास टाकायला आणि अधिक सुखासमाधानात राहायला या देणग्यांची फार मोठी मदत झाली असावी.

## शिपायांचे बंड

दुर्दैवाने ही परिस्थिती बिघडायला फार काळ लागला नाही. १८५७ च्या मे महिन्यात ब्रिटिश ज्याला शिपायांचे बंड म्हणतात व भारतीय पहिले स्वातंत्र्ययुद्ध म्हणतात ती महान घटना घडली. या घटनेबरोबरच भारतीय चित्र-फलकावरून तैमूर घराण्याचे नावनिशाणही पुसले गेले व देश एका परकीय सत्तेच्या वर्चस्वाखाली आला. या स्थित्यंतराचे परिणाम गालिबला भोवल्यावाचून राहिले नाहीत.

हे शिपायांचे बंड म्हणजे ब्रिटिशांनी या देशातील आपला मूळचा व्यापारी व्यवसाय सोडून देशावर शासन करण्यास सुरवात केली तेव्हापासून

त्यांनी जी राजकीय दडपशाही व अरेरावी चालवली होती तिचा परिपाक होय. १७ व्या शतकाच्या प्रारंभी काही इतर युरोपीय सत्तांबरोबर तेही व्यापारी म्हणूनच भारतात आले. त्यासाठी इंग्लंडात एका शाही सनदीने ‘ईस्ट इंडिया कंपनी’ची स्थापना करण्यात आली होती. जोपर्यंत केंद्रीय मोंगल सरकार प्रथम आग्र्याला व नंतर दिल्लीला बळकट व प्रभावी होते, तोपर्यंत इंग्रजांनी आपला व्यवसाय मोठ्या कसोशीने चालविला. १७०७ मध्ये औरंगजेबाच्या मृत्यूनंतर साम्राज्याच्या दूरदूरच्या प्रदेशांवरील दिल्ली शासनाची पकड हळूहळू ढिली होत गेली आणि असंतोषाचा व अंतर्गत लढायांचा काळ सुरू झाला. अशा संत्रस्त परिस्थितीत इंग्लंड व फ्रान्स या दोन देशांच्या व्यापारी कंपन्यांना हवी ती संधी सापडली. या देशातील आपले वर्चस्व वाढवण्याच्या हेतूने त्यांनी येथील अंतर्गत राजकारणात अधिक सक्रिय भाग घ्यायला सुरवात केली. त्यांनी आपल्या तैनातीत सशस्त्र सैन्य ठेवायला प्रारंभ केला व आपल्या वखारींना तटबंदी केली. विभिन्न संस्थानिकांना आपल्या आश्रयाखाली आणण्याच्या हेतूने ते स्थानिक भांडणतंट्यांतून पक्ष घेऊ लागले. कालांतराने या भांडणांचे पर्यवसान या देशात अग्रस्थान मिळवण्यासाठी इंग्लंड-फ्रान्स यांच्या दरम्यान झालेल्या चुरशीत आले.

दीर्घकालीन शांततेने व संपन्नतेने आपल्या पाठोपाठ या देशाच्या प्रशासनात व समाजव्यवस्थेत अवनतावस्था आणली होती. ज्यावेळी मोठमोठी राज्ये पत्त्याच्या बंगल्याप्रमाणे धडाधड कोसळून पडत होती व रातोरात त्या जागी दुसरी राज्ये उदयास येत होती, तो काळ म्हणजे दैव काढायला निघालेल्या कोणत्याही महत्त्वाकांक्षी माणसाच्या दृष्टीने साहजिकच अनुकूल होता. आपापल्या वर्चस्वाचे क्षेत्र विस्तारण्यासाठी इंग्लंड व फ्रान्स यांच्यात अनेक वर्षांपासून शर्यत लागली होती. या शर्यतीत इंग्लंड अधिक सुदैवी ठरले व बऱ्याच विस्तृत प्रदेशावर त्यांचे वर्चस्व स्थापन झाले. फ्रेंचांची हळूहळू माघार होत गेली व त्यांना कोणत्याही मुकाबल्याशिवायच आपल्या प्रतिस्पर्ध्यांच्या हवाली मोकळे मैदान देऊन निघून जावे लागले. आपल्या स्वतःच्या अधिकाराद्वारे अथवा आपल्या मांडलिकांच्या मार्फत या देशाच्या

अफाट प्रदेशाचे नवे मालक बनलेल्या इंग्रजांनी देशावर संपूर्ण ताबा मिळवायला चिकाटीने सुरवात केली. परिणामतः, त्यांनी नागावलेले भारतीय राजे व संस्थानिक यांची मने दुखावली जाऊन त्यांनी आपल्या या नव्या अधिपतीविरुद्ध मनांत डूख धरला. जोपर्यंत कोणताही सुसंघटित विरोध उभा ठाकला नाही, तोपर्यंत हा द्वेषाग्नी आतल्या आत धुमसत राहिला. हा असंतोष वर उफाळून येण्यासाठी योग्य संधीची वाट पाहात होता. ही संधी ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यांनी सैन्यासाठी नव्या प्रकारची काडतुसे देण्याचा अचानक निर्णय घेतल्याने मिळाली. बंदूक उडवण्यापूर्वी या काडतुसाचे टोक दाताने धरून तोडावे लागे. या काडतुसांत डुकराची व गाईची चरबी मिसळलेली असल्यामुळे हिंदू व मुसलमान या दोघांनाही धर्मभ्रष्ट करण्याचा आणखी एक उपाय इंग्रजांनी शोधून काढलेला आहे अशी अफवा जिकडे-तिकडे पसरली.

इंग्रज लोक भारतात आले तेव्हापासून स्थानिक जनतेला धर्मभ्रष्ट करून खिस्ती बनवण्याचे त्यांचे धोरण सुपरिचितच होते. वस्तुतः, ईस्ट इंडिया कंपनीची सनद १८३३ साली ज्या कारणांसाठी पुन्हा नव्याने देण्यात आली, त्यांपैकी ते एक होते. ब्रिटिश प्रशासनाने देशात ठिकठिकाणी शाळा व कॉलेजे उघडली होती, त्यांतून खिस्ती धर्माची शिकवण हे नियमित अभ्यासक्रमाचे अंग होते. खुद्द दिल्लीतच दिल्ली कॉलेजातील काही विद्यार्थ्यांनी उघडउघड खिस्ती धर्माचा स्वीकार केला होता. त्यांपैकी मास्टर रामचंद्र व डॉ. चमणलाल यांची नावे प्रमुख होती. ब्रिटिश मिशनऱ्यांच्या हेतूबद्दल व कार्याबद्दल आधीच साशंक असलेल्या सामान्य जनतेची या घटनेनंतर खात्री पटली की ब्रिटिश राज्यकर्ते तरुणांना बाटवून त्यांच्या परंपरागत धर्मापासून त्यांना तोडण्यास सिद्ध झाले आहेत. अशा संशयग्रस्त वातावरणात काडतुसाबद्दलच्या नव्या अफवेने आग ओतली. साहजिकच, लोकांचा तिच्यावर चटकन विश्वास बसून सैन्यात असंतोषाचा वणवा पसरला.

बंडाची पहिली गोळी झडली ती १० मे १८५७ रोजी, मीरतला, एका लष्करी परेडच्या वेळी. तेथील पायदळाने आपल्या ब्रिटिश कमांडरचा हुकूम

पाळण्यास नकार दिला आणि बंड केले. त्यांनी आपल्या अधिकाऱ्यांना ठार मारले व आधीच अधिकाऱ्यांची अवज्ञा केल्याबद्दल तुरुंगात डांबून ठेवलेल्या आपल्या साथीदारांना त्यांनी तुरुंगाची दारे फोडून मुक्त केले. त्याच दिवशी संध्याकाळीं त्यांच्यापैकी पुष्कळजण दिल्लीला कूच करून गेले व तेथे दुसऱ्या दिवशी सकाळीं, म्हणजे ११ मे १८५७ रोजी, येऊन थडकले. हिंदी सैन्याचे नेतृत्व आपल्या हाती घेऊन स्वतःला हिंदुस्थानचा शहानशहा म्हणून जाहीर करण्याची त्यांनी बहादुरशहाला विनंती केली. त्यावेळी बहादुरशहा ८२ वर्षांचा असून, ही विनंती मान्य करायला राजी नव्हता. परंतु परिस्थिती इतकी जबरदस्त बिकट होती की त्याला प्रतिकार करता आला नाही. या दरम्यान, बंडाची आग इतर शहरांतूनही पसरली होती. बंडाचे नेते हळूहळू राजधानीत गोळा झाले व त्यांनी एक हंगामी सरकार स्थापन केले. बहादुरशहा त्याचा नामधारी प्रमुख होता. दिल्लीतील सर्व ब्रिटिश अधिकाऱ्यांना व नागरिकांना एक तर ठार मारण्यात आले किंवा त्यांना शहरातून पळून जाऊन मिळेल तेथे आश्रय घ्यावा लागला. दिल्ली शहर हिंदी फौजेच्या ताब्यात पाच महिन्यांच्या वर राहिले. हा सारा वेळ ब्रिटिश अधिकाऱ्यांनी आपली डोकी शाबूत ठेवली. पुढे निव्वळ विच्छेदनाच्या व नशिबाच्या जोरावर देशाच्या विभिन्न भागांतील विद्रोह त्यांना शमवता आला आणि सरतेशेवटी दिल्लीची लढाईही त्यांनी जिंकली. १९ सप्टेंबर १८५७ रोजी त्यांनी शहर पुन्हा ताब्यात घेतले.

यानंतर प्रतिशोधात्मक दडपशाहीचा दीर्घ कालखंड सुरू झाला. हजारो नागरिकांच्या केवळ नाममात्र व झटपट चौकशा होऊन त्यांना फासावर चढवण्यात आले. त्यांची मालमत्ता व घरातली चीजवस्तू जप्त करण्यात आली. फाशीच्या शिक्षेतून सुटका करून घेण्यासाठी जबरदस्त दंड भरावा म्हणून त्यांना सांगण्यात आले. कित्येक लोक शहर सोडून दुसऱ्या गावी पळून गेले. घरी परतण्याजोगी परिस्थिती पुन्हा येईपर्यंत त्यांना दीर्घकाळ-पावेतो दारिद्र्यात व हालअपेष्टात दिवस कंठावे लागले.

बंडाच्या काळात गालिब दिल्लीतच राहिला व त्याने शहर सोडले नाही.

खरी गोष्ट अशी होती की जाण्यासाठी त्याला इतरत्र ठावठिकाणाच नव्हता. त्याचे हे दिवस अतिशय विवंचनेत गेले. बरेच दिवसांपासून दोन ठिकाणाहून मिळणाऱ्या उत्पन्नावरच तो मुख्यतः गुजराण करीत असे. एक म्हणजे ब्रिटिश खजिन्यातून मिळणारे सालाना ७५० रु. चे पेन्शन, व दुसरे राजघराण्याचा इतिहास लिहिण्यासाठी बहादुरशहाकडून मिळणारे सालाना ६०० रु. बंडखोर दिल्लीत शिरून ब्रिटिश सत्ता उलथून पडताच त्याच्या निर्वाहाची ही दोन्ही साधने नष्ट झाली. ब्रिटिश राजवटच संपुष्टात आल्यामुळे कौटुंबिक पेन्शन मिळू शकले नाही, आणि बहादुरशहाही वेतन देऊ शकला नाही, कारण त्याची त्याच्या स्वतःवरच सत्ता नव्हती. काही असले तरी आपल्या वचनपूर्तीसाठी त्याच्याजवळ पैसाच नव्हता. गालिबने हे काही महिने कसेबसे काढले.

हा उठाव मूलतः चुकीच्या कल्पनेवर व सदोष नियोजनावर आधारलेला होतो. किंबहुना तो पूर्णतः अनियोजित होता. म्हणून त्याचे अपयशही अटळ होते. बंडाच्या नेत्याजवळ कोणतीही सामूहिक योजना किंवा कार्यक्रम हाती नव्हता. वेगवेगळ्या शहराचे वेगवेगळे नेते होते व त्यांच्यात कोणत्याही प्रकारचा मेळ अथवा सहकार्य नव्हते. उलट पक्षी, ब्रिटिशांना सुसंघटित नेतृत्वाचा व त्यांच्यासमोरील सुस्पष्ट उद्दिष्टांचा लाभ मिळाला. खुद्द हिंदी जनतेत सुद्धा ब्रिटिशांना विरोध करण्याच्या बाबतीत एकजूट नव्हती. उदाहरणार्थ, पंजाबने ब्रिटिशांना एकदिलाने पाठिंबा दिला आणि विविध शीख संस्थानांनी पुरवलेल्या सैन्यानेच प्रथम दिल्लीला व नंतर लखनऊला ब्रिटिशांच्या आघाडीचे काम केले. नेपाळचे राज्यही ब्रिटिशांच्या मदतीला धावून गेले. हिंदी फौजांना फारशी तालीम नव्हती व त्या संघटित नव्हत्या. त्यांचे बालेकिल्ले एकामागून एक कोसळत गेले आणि वर्षाच्या अखेरीस ब्रिटिशांनी आपली प्रभुसत्ता पूर्ववत प्राप्त केली. पण पूर्वीपेक्षा कितीतरी अधिक प्रमाणात !

पूर्ववत शांतता प्रस्थापित झाल्यानंतर व ब्रिटिशांनी दिल्लीचा कबजा घेतल्यानंतर, गालिबला आशा वाटत होती की परिस्थिती स्थिरस्थावर होईल

व त्याच्या कुटुंबाचे पेन्शन पूर्ववत सुरू होईल. पण पुढील घटनांनी त्याची ही प्रिय अपेक्षा खोटी पाडली.

गालिब हा अत्यंत दूरदर्शी व व्यवहारचतुर माणूस होता. दिल्लीत जेव्हा गडबड सुरू झाली त्यावेळी वारा कोणत्या दिशेने वाहील याचा कोणालाच कयास करता आला नाही. म्हणून ब्रिटिश-विरोधी लोकांच्या हालचालीपासून तो बराचसा अलिप्त राहिला. तरीदेखील या हालचालींचे केंद्र अथवा बहादुरशहाचा राजदरबार असलेल्या लाल किल्ल्याशी त्याला आपले संबंध सर्वस्वी तोडून टाकता आले नाहीत. बादशहाचा साहित्यिक सल्लागार महंमद इब्राहीम झौक १८५४ च्या नोव्हेंबरात मरण पावला होता. त्याच्या जागी गालिबची नेमणूक झाली होती. राजदरबारातील सरकारी इतिहासकाराच्या पदाच्या जोडीला सोपवलेल्या या नव्या कार्यामुळे कमीअधिक नियमितपणाने बादशहाकडे हजेरी लावणे त्याला आवश्यक होते. उलट पक्षी, ज्याच्या-बरोबर तो नेहमीप्रमाणे स्नेहाचे व सामाजिक संबंध ठेवू शकेल असा एकही ब्रिटिश अधिकारी दिल्लीला उरला नव्हता. म्हणून बहादुरशहाच्या दरबाराशी संबंध ठेवून आपले मनोगत उघड न करणेच त्याला विवेकीपणाचे वाटले. इतके अवधान राखूनही दैव त्याला अनुकूल झाले नाही.

## ‘शिक्या’चा आरोप

हिंदी सैन्याने दिल्ली शहर आपल्या ताब्यात घेतले असताना, ब्रिटिशांनी दिल्लीत आणि खुद्द लाल किल्ल्यातही अतिशय कार्यक्षम अशा हेरांचे जाळे पसरून ठेवले होते. हे हेर अधिकृत वा अनधिकृत अशा सर्व प्रकारच्या बातम्या गोळा करून काश्मीर गेटापलीकडील रिजवर ठाण मांडून बसलेल्या ब्रिटिश कमांडरला त्या नियमितपणे पोचवीत असत. अशाच एका बातमी-दाराने एक दिवस अशी बातमी आणली की बहादुरशहाने भरवलेल्या एका राजदरबारात गालिब सुद्धा हजर होता आणि नवीन नाण्यावर खोदण्यासाठी त्याने स्वतः रचलेला एका ‘शिक्का’ बादशहाला सादर केला. हे खरे नव्हते. गालिबच्या नावावर खपवलेला शिक्का दुसऱ्याच

एका किरकोळ कवीने रचलेला होता, इतकेच नव्हे, तर ज्या तारखेला हा शिक्का गालिबने बादशहाला सादर केल्याचा आरोप केलेला होता त्या तारखेच्या आधीच एका नियतकालिकात तो वस्तुतः प्रसिद्धही झाला होता. तरी सुद्धा हेराने दिलेल्या या बातमीची नोंद ब्रिटिश दप्तरात कायम राहिली. ब्रिटिशांनी दिल्ली पुन्हा काबीज केल्यानंतर गालिब दिल्लीच्या चीफ कमिशनरला भेटायला गेला तेव्हा या बातमीबद्दल त्याला जाब विचारण्यात आला. बंडाच्या वेळीं गालिबने इंग्रजांविरुद्ध प्रत्यक्ष कोणताच भाग घेतला नसल्यामुळे त्याच्या जिवाला व मालमत्तेला धक्का लागला नव्हता. आणि हा 'शिक्का' म्हणजे कवीच्या मनाचा एक दुबळेपणा म्हणून मानला गेला व त्याला माफ करण्यात आले. ज्या दिवसांत, निव्वळ संशयापायीच लोकांना आपला जीव गमवावा लागे किंवा तुरुंगात जावे लागे, त्या काळात असे मानणे म्हणजे काही लहानसहान गोष्ट नव्हती. मात्र, या आरोपाचा परिणाम असा झाला की त्याचे पेन्शन बंद झाले आणि गव्हर्नर जनरलच्या किंवा लेफ्टनंट गव्हर्नरच्या दरबाराचे निमंत्रणही त्याला इतःपर येईनासे झाले. गालिबची अपेक्षा होती की शांतता पुन्हा नांदू लागल्यानंतर 'पूर्व'-परिस्थिती पुन्हा प्रस्थापित होईल. पण या अनपेक्षित घटनेने त्याची दारुण निराशा केली. त्याची परिस्थिती सुधारली तर नाहीच, उलट आणखीच खालावली. त्याच्या काही मित्रांनी व चाहत्यांनी त्याला साह्य केले नसते, तर त्याच्या अडचणी त्याला अगदी असह्य झाल्या असत्या. सुदैवाने, रामपूरचे नबाब यूसुफ अली खान या प्रसंगी त्याच्या मदतीला धावून आले.

## रामपूर दरबाराशी संबंध

महंमद सैद खान याच्या मागून १८५५ साली रामपूरच्या गादीवर आलेला त्याचा पुत्र नवाब यूसुफ अली खान मोठ्या साहित्यिक योग्यतेचा एक उदयोन्मुख तरुण होता. लहान वयातच त्याच्या वडिलांनी त्याला शिक्षण पुरे करण्यासाठी दिल्लीला पाठवले. त्या दिवसात इतर शिक्षकांबरोबर गालिबनेही त्याला थोडेफार फारशी शिकवले. तो रामपूरला परतल्यावर हा संबंध

टिकला नाही. १८५५ साली जेव्हा तो तख्तनशीन झाला तेव्हा त्याच्यासाठी एक कविता रचून गालिबने जुन्या संबंधाचे धागेदोरे पुन्हा जुळवण्याचा प्रयत्न केला. पण यालाही प्रतिसाद मिळाला नाही. त्यानंतर गालिबने आपले मनसुबे आपल्या मनातच ठेवले. १८५७ च्या सुरवातीस शिपायांच्या बंडापूर्वी, गालिबचा एक जिगरदोस्त मौलवी फाजल हक्क रामपुरात होता व रामपूरच्या या तरुण नवाबावर त्याचे फार वजन होते. एक 'कसीदा' लिहून तो रामपूरच्या नवाबाला पाठवण्याविषयी फाजल हक्कने गालिबला सुचवले. त्याला आशा वाटत होती की त्यामुळे गालिब आणि नवाब यांच्यातील तुटलेले संबंध पुन्हा जुळून येतील आणि परिणामी कदाचित एखादे कायमचे वर्षासन किंवा निदान एकदम मोठी देणगी तरी त्याच्या पदरात पडेल.

सुदैवाने, यावेळी गालिबचे नशीब उघडले. गालिबच्या या कसीद्याचे हार्दिक स्वागत तर झालेच, पण नवाब यूसुफ अली खानाने काव्याच्या बाबतीत गालिबचा 'शागीर्द' व्हायचे ठरवले. दोघांतील हे नवे संबंध जडून दोन महिने उलटतात न उलटतात तोच देशात राजकीय वावटळ उठली. या अस्वस्थतेच्या काळात सुद्धा गालिबने नवाबाशी नियमित पत्रव्यवहार चालू ठेवला होता. यापूर्वी त्याला नवाबाकडून ठराविक वेतन जरी मिळत नव्हते तरी अधूनमधून आर्थिक साह्य होत असे. दिल्लीत ब्रिटिशांचे आसन स्थिरावल्यानंतर त्यांच्याशी जुने मित्रत्वाचे नाते पुन्हा जोडण्याचे गालिबचे प्रयत्न फसले व त्याचे कौटुंबिक वर्षासनही पुन्हा सुरू झाले नाही. तेव्हा आपल्या मागच्या विवंचनेचा ससेमिरा ज्याने थांबेल असा कायमचा वजीफा ठरवून टाकण्याची त्याने नवाबाला विनंती केली. त्यावर नवाबाने रामपूरच्या खजिन्यातून इतःपर त्याला दरमहा १०० रुपये मिळत जावे असा हुकूम केला.

## 'दस्तंबू'

बंडाच्या धामधुमीच्या काळात घरात बसून काढलेल्या रिकामटेकड्या दिवसांत शहरात भोवताली काय घडत आहे याची गालिब टिपणे ठेवीत असे. दररोजच्या घडामोडींची नोंद असलेली ती नियमित रोजनिशी नव्हती,

परंतु त्या घटनापूर्ण कालखंडाचा संपूर्ण इतिहास संकलित करण्यासाठी, गरज पडली तर वापरता येतील अशा मुख्य मुद्द्यांची ती निव्वळ टाचणे होती. ब्रिटिशांनी जेव्हा दिल्लीवर पुन्हा विजय मिळविला तेव्हा या टिपणांना त्याने व्यवस्थित आकार दिला आणि 'दस्तंबू' नावाचा एक बारकासा फारशी ग्रंथ तयार केला. या हकीकतीत विशेषनामे वगळून आपण एकही अरबी भाषेचा शब्द वापरलेला नाही असा गालिबचा दावा आहे. हा दावा पूर्णांशाने बरोबर नाही. गालिबने शिकस्त करूनही काही अरबी शब्द घुसडले आहेत. तरीसुद्धा दैनंदिन वापरीत असलेले शब्द टाळण्याच्या त्याच्या हेतुपुरःसर प्रयत्नामुळे त्याला अभिजात फारशी शब्द वापरावे लागले, ते अधिकांशी प्रचारात नव्हते. यामुळे त्याचा ग्रंथ बोजड व अवघड झाला आहे.

तत्कालीन घटनांवरील एक संदर्भ-ग्रंथ म्हणून सुद्धा तो पूर्णतया विश्वसनीय नाही. आपण हे पाहिलेच की गालिब बहादुरशहाशी आपले संबंध राखून होता व कधीमधी त्याला ब्रिटिश-विरोधी लोकांतही ऊठबस करावी लागे. त्याला पेचात पाडील असे कोणतेही ब्रिटिशविरोधी काम गालिबने केलेले नव्हते, तरी त्याची सदसद्विवेकबुद्धी त्याला स्वस्थ बसू देत नव्हती. कारण त्याने स्वीकारलेली निष्क्रिय भूमिका ब्रिटिश सरकारला पुरेशी तटस्थपणाची वाटणार नाही, हे त्याला ठाऊक होते. उलट पक्षी, बादशहाशी असलेल्या त्याच्या मैत्रीचा विपर्यास करून तो ब्रिटिश-विरोधी असल्याचा ठपका त्याच्यावर ठेवता येईल. म्हणून त्याने आपल्या टिपणांवरून संपूर्ण 'दस्तंबू' संकलित केला, तेव्हा त्यात नमूद केलेल्या घटनांत हिंदी फौजांनी केलेल्या चुकांबाबत न्यूनोक्ती राहणार नाही किंवा ब्रिटिश सैन्याने केलेल्या अत्याचारांबाबत अतिशयोक्तीही राहणार नाही, अशी खबरदारी त्याने घेतली. 'हा ग्रंथ स्वीकारार्ह व्हावा' म्हणून त्याच्या काही भेट-प्रती इंग्रज अधिकारी मित्रांकडे व आश्रयदात्यांकडे पाठवण्याचा अगदी सुरवातीपासूनच त्याचा विचार होता. त्यामुळे त्याने काही घटनांचे काहीच्या काहीच अर्थ लावले आणि काहींना भलतेच महत्त्व दिले. असा ग्रंथ इतिहासाचा विश्वसनीय संदर्भ-ग्रंथ होऊ शकत नाही, याची कारणे उघड आहेत.

या पुस्तकाचा उपयोग ब्रिटिश अधिकाऱ्यांशी नव्याने परिचय करून घेण्याचे साधन म्हणून आणि ब्रिटिशांच्या आपत्काली त्यांच्याशी सख्य ठेवल्याचा पुरावा म्हणून करून घेण्याचा त्याचा इरादा होता. पुस्तक प्रसिद्ध झाले तेव्हा त्याने त्याच्या भेट-प्रती भारतातील तसेच विलायतेतील ब्रिटिश उच्चाधिकाऱ्यांकडे रवाना केल्या. पण त्याचा काहीही प्रभाव पडला नाही. किंवा हवे ते फळही मिळाले नाही. या पुस्तकातील महान दोष म्हणजे त्याची अनाकलनीय भाषा. ब्रिटिश सत्तेशी दिलजमाई करण्याचे त्याचे व्यक्तिगत प्रयत्न म्हणूनच फारसे यशस्वी ठरले नाहीत. यादरम्यान, त्याचे अनेक मित्र ब्रिटिश सत्ताधिकाऱ्यांकडून त्याच्यासाठी माफी मिळवण्याचा प्रयत्न करीत होते. परंतु रामपूरच्या नवाबाने त्याच्याकरता मध्यस्थी केली नसती तर त्याच्या निरपराधीपणाची ब्रिटिशांना कधीतरी खात्री पटली असती की नाही याची शंकाच आहे. अखेरीस, १८६० सालच्या मे महिन्यात ब्रिटिशांनी आपला पूर्वीचा हुकूम मागे घेतला व त्यानुसार त्याच्या कुटुंबाचे वर्षासन पुन्हा सुरू झाले. तीन वर्षांनंतर, मार्च १८६३ मध्ये सरकारी समारंभात सहभागी होण्याचीही त्याला परवानगी देण्यात आली. अशा प्रकारे सारे स्थिरस्थावर होऊन मे १८५७ पूर्वीची स्थिती पुन्हा प्राप्त झाली.

## ‘ काती बुरहान ’

गालिब हा मुळात कवी व लेखक होता. आर्थिक अडचणी आणि सांसारिक विवंचना पाठीमागे असताना सुद्धा, साहित्यिक कार्यक्रमांपासून तो फार काळ अलिप्त राहू शकत नसे. बंडाच्या धामधुमीच्या काळात, लाल किल्ल्यात होणाऱ्या प्रासंगिक भेटीगाठीव्यतिरिक्त, तो बहुतेक एकांतात राही व घराबाहेर मुळी सुद्धा फिरकत नसे. वाचनाचे त्याला विलक्षण वेड होते व त्याची स्मरणशक्तीही तीव्र होती. या दिवसांतही ग्रंथ हेच त्याचे सर्वोत्तम मित्र होते. त्याच्या ग्रंथसंग्रहात ‘ बुरहाने काती ’ नावाचा एक फारशी शब्दकोश होता, तो त्याने फावल्या वेळात चाळायला सुरवात केली. त्याची नवी आवृत्ती कलकत्त्याहून प्रकाशित झाली होती. कुणा एका महंमद हुसेन ताब्रीझीने

संकलित केलेला हा शब्दकोश आहे. तो ग्रंथ वाचताना गालिबला त्यात असंख्य ठिकाणी विसंगती आढळून आली. आपल्याजवळच्या प्रतीमध्ये समासात त्याने त्यावर आपले टीकात्मक शेरे नोंदून ठेवायला सुरवात केली. हळूहळू या टाचणांची संख्या इतकी फुगली की परिस्थिती पूर्ववत झाल्यावर आपल्या शागीर्दांच्या व दोस्तांच्या उपयोगासाठी त्याने ती सारी नकलवून घेतली. सुरवातीला ती प्रकाशित करण्याचा त्याचा मानस नव्हता. परंतु पुढे काही मित्रांनी सल्ला दिला की त्यांचे प्रकाशन केल्यास ते सामान्य वाचकाला उपयुक्त होईल आणि एक फारशी पंडित म्हणून त्याच्या कीर्तीतही भर पडेल. आतापावेतो तो भारतातील फारशी लेखकांवर टीका करीत आला होता व फारशी भाषेच्या बाबतीत त्यांचे ज्ञान विश्वासार्ह नाही असे तो म्हणत असे. 'बुरहाने काती'चा संकलक सुद्धा, त्याचे पूर्वज मूळचे इराणचे होते तरी भारतातच जन्मलेला व वाढलेला होता. म्हणून या शब्दकोशावरील आपली टीका प्रसिद्ध करायला गालिब राजी झाला. तो या आशेने की तिने भारतीय लेखकाच्या पांडित्याच्या अविश्वसनीयतेबद्दलचे त्याचे जुने प्रतिपादन सिद्ध होईल. 'काती बुरहान' या नावाने हा ग्रंथ प्रथम १८६२ साली प्रकाशित झाला. त्याने जणू गांधीलमाशांचे पोळे डिवचल्यासारखेच झाले. कुठल्याही परिवर्तनाच्या बाबतीत मानवी स्वभाव अत्यंत जागरूक असतो. आपल्यापैकी बहुतेक जण आपल्या पूर्वजांच्या पावलावर पाऊल टाकून जात असतात, ते निव्वळ बदलाची किंवा नवा प्रयोग करून पाहण्याची भीती वाटते म्हणूनच. याहीपेक्षा वाईट आहे ते हे की, अनेकदा एखाद्या विशिष्ट भूमिकेचे वैयर्थ्य किंवा अयुक्तता पटून सुद्धा आपण तिला चिकटून राहतो, कारण आपल्या पूर्वजांकडून ती वंशपरंपरेने आलेली असते व ती बदलण्यासाठी किंवा सुधारण्यासाठी लोकमताविरुद्ध उभे राहण्यास आपण धजत नाही. शिक्षण व विद्वत्ता यांच्यासह जीवनाच्या सर्व क्षेत्रांच्या बाबतीत हे खरे आहे. 'बुरहाने काती' हा बऱ्याच काळापासून चालत आलेला फारशी भाषेतील सर्वमान्य अधिकृत ग्रंथ होता. त्याच्या अधिकृततेवर व विश्वसनीयतेवर सर्व विद्वज्जनांनी आपले शिक्कामोर्तब

केलेले होते. त्याविरुद्ध बोलणे म्हणजे धृष्टताच नव्हे तर एक प्रकारे धर्मद्रोहही होता आणि गालिबने हा अपराध केला होता. ग्रंथ प्रसिद्ध होतो न होतो तोच अक्षरशः वादळ उठले. त्याच्या भूमिकेचे खंडन करण्याचा प्रयत्न करणारी पुस्तके व पत्रिका एकामागून एक प्रसिद्ध होऊ लागल्या. गालिबने व त्याच्या मित्रांनीही सारे मुकाट्याने खाली मान घालून सहन केले नाही. या हल्ल्याला तोंड देण्याची त्यांनीही शिकस्त केली. कालांतराने, विरोधी पक्षाचा संताप ओसरला पण पूर्णपणे मावळला नाही. वस्तुतः, अमिनुद्दीन नावाच्या मिथ्यारोप करणाऱ्या एका लेखकाकडून नुकसानभरपाईची मागणी करण्यासाठी गालिबला कोर्टाकडे धाव घ्यावी लागली. पण या खटल्यात त्याला यश मिळाले नाही. उपर्युक्त लेखकाची चामडी बचावण्याच्या हेतूने तत्कालीन विख्यात विद्वानांनी शब्दच्छल करून विरोधी पक्षाने वापरलेल्या अपमानास्पद शब्द-प्रयोगांतील दंशाची तीव्रता कमी करण्यासाठी त्याचे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे गालिबला आपला खटला कोर्टाबाहेर मिटवून आपली फिर्याद परत घ्यावी लागली.

## राजकवी

१८६० मध्ये गालिबचे पेन्शन आणि १८६३ मध्ये सरकारी समारंभांतून सहभागी होण्याचा मान परत मिळाल्यानंतर, आणखी मानसन्मान मिळवण्याची आकांक्षा त्याने धरली. इंग्लंडच्या सम्राज्ञीचा राजकवी म्हणून आपली नेमणूक व्हावी आणि 'दस्तंबू' हा ग्रंथ सरकारी आश्रयाने प्रकाशित व्हावा असे निवेदन त्याने केले. अर्थात अपेक्षित होते त्याप्रमाणे त्याच्या दोन्ही मागण्या फेटाळण्यात आल्या. शासनाच्या या निर्णयाला गालिबच्या समकालीनांचे हेवेदावे निर्णायकपणे कारणीभूत झाले, असे दिसते. इंग्लंडमधील गृहखात्याच्या अधिकाऱ्यांचे उत्तर बरेचसे उत्तेजनपर किंबहुना अनुकूलही होते. त्यांचे म्हणणे असे की गालिबला राणीचा राजकवी म्हणून नेमता येणार नाही, परंतु गव्हर्नर जनरलने आपल्या दरबारचा कवी म्हणून ठेवण्याचे ठरवले तर त्याला त्यांची हरकत राहणार नाही. त्यावर गव्हर्नर

जनरलने बंडाच्या काळातील त्याच्या वर्तनासंबंधाने रिपोर्ट मागवला. या चौकशीच्या दरम्यान बहादुरशहासाठी त्याने लिहिलेल्या तथाकथित शिक्क्या-संबंधीच्या हेराच्या अहवालाने पुन्हा डोके वर काढले.

त्यातून निष्कर्ष असा निघाला की गालिब प्रत्यक्ष ब्रिटिशविरोधी जरी नाही तरी बंडखोरांना सहानुभूती दाखवणारा ठरला. याने गव्हर्नर जनरलच्या दरबारात कवी म्हणून नियुक्त होण्याची जी काय शक्यता होती, तीच सारी नाहीशी झाली. असे झाल्यावर सुद्धा ही बाब पंजाबच्या लेफ्टनंट-गव्हर्नर-कडे संदर्भित करण्यात आली व गालिबने केलेल्या दोन मागण्यांवर आपल्या स्तरावर योग्य ती कारवाई करण्यासाठी व त्याचा रिपोर्ट पाठवण्यासाठी त्याला हुकूम दिला गेला.

## साहित्यिक लोकप्रियता

ऐहिक दृष्टया जरी गालिबची स्थिती सुधारली नाही आणि हातातोंडाची गाठ पाडण्यासाठी त्याला सतत झगडावे लागले, तरी साहित्यिक विश्वात मात्र आपल्या प्रतिष्ठेत त्याने फार मोठी भर घातली होती. १८५७ च्या राजकीय उत्पातापूर्वी त्याचे उर्दू व फारशी काव्य-संग्रह प्रकाशित झालेले होते. उर्दू 'दिवान' १८४१ व १८४७ साली असा दोनदा आणि फारशी दीवान १८४५ मध्ये प्रकाशित झाला होता. गालिबच्या पुस्तकांच्या नव्या आवृत्ती पुन्हा प्रकाशित व्हाव्या अशी लोकांची इच्छा होती. जुन्या आवृत्ती बहुतेक संपल्या असून त्या उपलब्ध नव्हत्या. विशेषतः उर्दू दिवानासाठी फार मागणी होती. त्याची प्रत त्याच्याजवळ नव्हती. एक प्रत त्याने कशीतरी पैदा केली आणि छपाईसाठी तयार केली. ती १८६१ मध्ये प्रकाशित झाली. पण ही आवृत्ती चांगली नव्हती, तिच्या एकंदर सजावटीबाबत किंवा लिखावटी-बाबत मुळीच, काळजी घेतली नव्हती, आणि वर ताण म्हणजे त्यात मुद्रणदोषही मोठ्या प्रमाणात होते. म्हणून त्याने ही आवृत्ती स्वतः दुरुस्त करून कानपूरच्या सुप्रसिद्ध 'निझामी प्रेस'कडे पाठविली. ती तेथून पुढच्या साली म्हणजे १८६२ मध्ये प्रसिद्ध झाली. त्याच वर्षी लखनऊचा विख्यात

प्रकाशक मुंशी नवलकिशोर दिल्लीला आला व फारशी दिवानची नवी आवृत्ती काढण्यासाठी त्याने गालिबची परवानगी मागितली. गालिबने आपले लिखाण स्वतः कधीच आपल्या संग्रही ठेवले नव्हते. ते नबाब झियाउद्दीन अहमद खान व नाझिर हुसेन मिर्झा या त्याच्या दोन मित्रांजवळ सुरक्षित ठेवलेले होते. ते अनुक्रमे त्याच्या फारशी व उर्दू लिखाणाचा सांभाळ करीत. गालिबने नवलकिशोरची सूचना मान्य करून त्याला नबाब झियाउद्दीनकडे जायला सांगितले. मुंशी नवलकिशोर ते हस्तलिखित आपल्या बरोबर लखनऊला घेऊन गेले, परंतु अनेक कारणांमुळे पुस्तकाची छपाई जलद उरकता आली नाही. सुमारे एका वर्षानंतर, १८६३ च्या मध्यात पुस्तक मुद्रणालयातून बाहेर पडले.

गालिबच्या उर्दू व फारशी काव्याच्या या अनेक आवृत्ती वाचकांतील त्याच्या वाढत्या लोकप्रियतेच्या निदर्शक होत. तीन वर्षांच्या अल्पावधीत त्याच्या लिखाणाच्या चार आवृत्त्यांचे प्रकाशन म्हणजे त्याच्या रचनांची अधाशीपणे प्रतीक्षा करणाऱ्या जनतेच्या प्रशंसेचे प्रतीक आहे.

## रामपूरला भेट

१८५७ च्या सुरवातीस गालिबचे शिष्यत्व स्वीकारणाऱ्या रामपूरच्या नवाब यूसुफ अली खानाने त्याची आर्थिक विपन्नता पाहून त्याला रामपूरचे निमंत्रण दिले होते. त्यावेळी, परिस्थिती लवकरच पूर्ववत होऊन सरकारी अनुग्रह पुन्हा लाभण्याची मोठीच आशा गालिबला होती. त्यामुळे ब्रिटिश सत्ताधिकाऱ्यांशी त्याचे संबंध पूर्वीप्रमाणे होताच तो रामपूरला मोठ्या आनंदाने भेट देईल असे उत्तर त्याने नवाबाला दिले, पण त्याच्या अपेक्षा खोट्या ठरल्या आणि अधिकाऱ्यांनी त्याच्या सर्व विनवण्यांकडे पाठ फिरवली. यादरम्यान, रामपूरव्यतिरिक्त त्याच्या उत्पन्नाचे सर्व मार्ग बंद झाले होते. त्यामुळे, नवाब यूसुफ अली खानाचे कायमचे निमंत्रण स्वीकारणे बरे असे त्याला वाटले. दिल्लीतील जीवनही सुरक्षित नव्हते. ज्यांनी दुसऱ्या बहादुर-शहाच्या दरबाराशी संबंध ठेवला होता, किंवा त्याची नोकरी पत्करली होती, अशा अनेक लोकांना अटक होऊन शिक्षा झाल्या होत्या. जे निसटून गेले

होते अशांपैकी अनेकांचा छळ होत होता. जणू शिक्षेची सतत टांगती तलवार त्यांच्या शिरावर होती. बहादुरशहासाठी शिक्का लिहिल्याच्या आरोपावरून स्वतः गालिबवरच मुळीं वहीम होता. म्हणून काही काळ दिल्लीपासून दूर राहणेच श्रेयस्कर असा युक्तिवाद त्याने केला असावा. रामपूरला जाण्याचा निर्णय घेण्यास नवाबाकडून त्याला नियमित मासिक तनखा मिळत होता एवढीच एक गोष्ट कारणीभूत होती असे नाही, तर नवाबाच्या कृपेने बहुधा ब्रिटिशांशी त्याला समाधानकारक समझोता करता येईल, हे देखील एक कारण होते. बंडाच्या काळात नवाब ब्रिटिशांचा इमानी व कट्टर पुरस्कर्ता राहिलेला होता. त्याने त्यांना पैशाने, तसेच सशस्त्र सैन्य पुरवून साह्य केले होते. त्यामुळे ब्रिटिश राज्यकर्ते त्याचे अतिशय ऋणी होते व त्याच्या सेवेबद्दल त्यांनी विद्यमान रामपूर संस्थानालगतचे उत्तर प्रदेशातील काही जिल्हे त्याला बहाल केले होते. गालिबला या सर्व घडामोडी ठाऊक होत्या. अशा कठीण परिस्थितीत नवाबाच्या मध्यस्थीचा उपयोग करणे हाच एकमेव उपाय शिल्लक राहिला होता, हे त्याने अचूक हेरले. त्यानुसार तो जानेवारी १८६० मध्ये रामपूरला जाण्यासाठी निघाला.

गालिबचे स्वतःचे असे एकही मूल जिवंत नव्हते. त्याला अधूनमधून सात मुले झाली, परंतु ती सारी लहानपणीच वारली. त्यांपैकी कुणीही १८ महिन्यांच्यावर जगले नाही. त्याने प्रथम झेनुल अबिदिन खान या या आपल्या पत्नीच्या चुलतभावाला जवळ ठेवले. तोही कुणी मामुली कवी नव्हता. 'अरिफ' या टोपणनावाने तो लिहीत असे. दोन लहान मुलगे मागे टाकून हा तरुण गृहस्थ १८५२ साली क्षयाने मरण पावला. गालिबच्या पत्नीने त्याच्या थोरल्या मुलाची – बाकर अली खानाची – जबाबदारी पत्करली व त्याला आपल्याबरोबर घरी आणले. धाकटा हुसेन अली खान त्यावेळी दोनच वर्षांचा असल्यामुळे आपल्या आजीजवळ, म्हणजे गालिबच्या मेव्हणीजवळ, राहिला. दुर्दैवाने तीही लवकरच निधन पावली आणि त्यानंतर तो धाकटा मुलगाही गालिबजवळ राहायला आला. या दोन्ही मुलांचे पालनपोषण गालिबच्या बायकोने केले. सख्ख्या नातवंडाप्रमाणेच ती त्यांना

वागवी. गालिब रामपूरला गेला तेव्हा ही दोन्ही मुले त्याच्या बरोबर गेली. तो रामपूरला दोन महिन्यांपेक्षा जास्त राहिला. दिल्लीला माघारी येण्याजोगे वस्तुतः कोणतेच कारण नसल्यामुळे आणि रामपूरचे जीवन अतिशय सुखावह असल्यामुळे तेथले राहणे लांबवण्याचा त्याचा इरादा होता. असे असूनही त्याला परत यावे लागले, कारण नव्या वातावरणाला मुले कंटाळली नि घरची आठवण काढू लागली.

## पूर्ववत मानसन्मान

गालिबच्या रामपूरमधील याच वास्तव्यात नवाबाने त्याच्या वतीने ब्रिटिश अधिकाऱ्यांपाशी मध्यस्थी केली व परिणामी वर उल्लेखिल्याप्रमाणे त्याचे पूर्ण पेन्शन त्याला १८६० च्या मेमध्ये पुन्हा मिळाले.

सालाना ७५० रु. चे हे भिकारडे पेन्शन परत मिळवण्याबद्दल गालिबने जिवाचा एवढा आटापिटा का करावा याचे आश्चर्य वाटते. याचे उत्तर असे की ते त्याच्या उत्पन्नाचे एकमेव खात्रीचे व कायमचे साधन होते. कोणतीही इतर भर पडणार ती आकस्मिक धनाची व सुदैवाने एखादी संधी चालून आली तरच. कधीकाळी आपल्या वाट्याला संपत्ती येईल अशा निव्वळ आशेवर कुणी जगू शकत नाही. माणसाला आपल्या योजना व जीवनक्रम आखता यावा यासाठी कोणतातरी ठाम आधार लागतो. गालिबच्या बाबतीत बोलायचे तर बऱ्याच काळापासून हे एवढेच पेन्शन काय ते त्याच्या निर्वाहाचे एकमेव साधन होते हे एक. त्याहीपेक्षा अधिक म्हणजे मित्रमंडळीत ते त्याच्या स्वाभिमानाचे व प्रतिष्ठेचे कारण होते. ते बंद पडणे हा त्याच्या विरुद्ध असलेल्या लोकांनी मिटक्या मारीत केलेल्या चर्चेचा विषय झाला असावा. या पेन्शनीमुळे त्याला ब्रिटिश अधिकारी वर्तुळात सतत मुक्तद्वार मिळालेले होते. सरकारी दरबार-प्रसंगी अध्यक्षीय अधिकाऱ्याच्या – मग तो गव्हर्नर जनरल असो की एखाद्या प्रांताचा लेफ्टनंट गव्हर्नर असो – उजव्या हाताला दहाव्या क्रमांकाचे त्याचे स्थान होते. त्याच्या तुटपुंज्या पेन्शनीच्या मानाने हा मान अतिशय मोठा होता व त्याच्या समकालीनांना त्याबद्दल असूया वाटली

असावी. त्यामुळे या मानसन्मानाबद्दल, म्हणजे पेन्शन व राजदरबारप्रसंगी हजर राहण्याबद्दल, त्याला इतकी चिंता का वाटत होती हे समजण्याजोगे आहे.

भारतीय फौजांनी मीरतहून दिल्लीत ११ मे १८५७ ला प्रवेश केला होता. त्यापूर्वी त्याला एप्रिल १८५७ चे पेन्शन मिळाले होते. आता मे १८६० मध्ये, त्याला दरसाल ७५० रु. च्या दराने मे १८५७ ते एप्रिल १८६० पर्यंतची तीन वर्षांची थकलेली बाकी मिळाली, म्हणजे २२५० रु. उणे ४०० रु., जे त्याला मार्च १८५९ मध्ये आगाऊ दिले गेले होते. या रकमेपैकी (२१५० रु.) त्याने १५० रु. कचेरीतील खालच्या श्रेणीतील वेगवेगळ्या नोकरांना बक्षिसी म्हणून तिथल्या तिथेच वाटून टाकले. उरलेल्या २००० रु. पैकी १५०० रु., ज्याने ही सारी वर्षे त्याची देखभाल केली होती त्याचे देणे होते. याशिवाय, इतर घेणेकऱ्यांना द्यावयाचे ११०० रु. चे कर्ज बाकी राहिले होते. त्याला मिळालेली पेन्शनची थकलेली बाकी त्याच्या सर्व खर्चांच्या तोंडमिळवणीसाठी अपुरी होती. पण पेन्शनीच्या पुनःप्राप्तीने त्याच्या मनात नव्याने आशा व उत्साह निर्माण झाला. ब्रिटिश सत्ताधिकाऱ्यांशी पूर्ववत हार्दिक संबंध निर्माण करण्याची आशा त्याने यापूर्वी हताश होऊन सोडून दिली होती. तिला अजून जागा आहे असे त्याला वाटले. मानाचा पोशाख आणि सरकारी समारंभांचे निमंत्रण मिळवण्यासाठी त्याने नव्याने प्रयत्न केले ते यानंतरच. पूर्वी सांगितल्याप्रमाणे, विलियम बेंटिंकच्या काळात आपले पेन्शन प्रकरण सर्वोच्च सरकारात दाखल करण्यासाठी गालिब कलकत्त्याला गेला असताना, दरबारसमारंभांतून भाग घेण्याचा मान १८२३ सालापासून त्याला देण्यात आला होता. मानाचा पोशाख त्याला बऱ्याच नंतर बहाल करण्यात आला. या पोशाखात विविध प्रकारचे सात पायघोळ कपडे, मौल्यवान रत्नांचा शिरपेच आणि मोत्यांचा कंठा यांचा समावेश होता. दरबारात उपस्थित राहताना अधिष्ठित पदाधिकाऱ्याला त्याला नजराणा द्यावा लागत नसे. त्याऐवजी त्यांच्या सन्मानार्थ तो एखादा 'कसीदा' म्हणून दाखवी.

आता परिस्थिती पूर्ववत आल्यानंतरही आपण पूर्वीसारखेच दरिद्री राहिलो आहोत असे त्याला आढळले. पण त्यातून सुटका नव्हती. या

दरम्यान एप्रिल १८६५ मध्ये नवाब यूसुफ अली खान हा त्याचा प्रमुख आश्रयदाताच कॅन्सरने मरण पावला.

## कल्ब अली खान

नवाब यूसुफ अली खानाच्या जागी त्याचा थोरला मुलगा नवाब कल्ब अली खान गादीवर बसला. नव्या नवाबाच्या व त्याच्या शोकग्रस्त कुटुंबाच्या दुख-वट्यासाठी गालिबला रामपूरला जावे लागले. परंतु रामपूरच्या या दुसऱ्या भेटीचे अधिक महत्त्वाचे आणखीही एक कारण होते, ते हे की जुलै १८५९ पासून नवाबाकडून त्याला जो दरमहा १०० रु. मासिक तनखा मिळत होता, तो चालू राहतो की नाही याबद्दल त्याला चिंता वाटत होती. नवाब यूसुफ अली खान हा त्याचा शिष्य होता व आपल्या उर्दू कवितांबद्दल तो गालिबचा सल्ला घेई. म्हणून ही मासिक देणगी त्याच्या या सेवेबद्दलचा एकप्रकारे मोबदला किंवा वेतन मानता येईल. परंतु गालिब व नवा नवाब यांच्यात अशा प्रकारचा कोणताच संबंध नव्हता. नवाब त्याचा शिष्य नव्हता; म्हणून हे वेतन त्याने बंद केले असते तर ते अन्यायाचे ठरले नसते. गालिबला त्यामुळे खडतर हालअपेष्टा भोगाव्या लागल्या असत्या. त्यामुळे नवाबाला भेटून आपल्याविरुद्ध अशी कडक कारवाई केली जाणार नाही याची खात्री करून घेणे त्याला आवश्यक होते. त्यानुसार, नव्या नवाबाच्या राज्यारोहण-प्रसंगी गालिब रामपूरला गेला, व त्याचे वेतन निर्विघ्नपणे चालू राहील असे आश्वासन नवाबाने त्याला दिले. हे पाहून गालिबने निश्चितच सुटकेचा निःश्वास टाकला असेल.

'दस्तंबू' या त्याच्या पुस्तकाची एक प्रत ब्रिटिश सरकारच्या मुख्य सचिवाकडे पाठवण्यास सांगणारे पंजाब सरकारचे पत्र त्याला मिळाले, त्यावेळी गालिब रामपूरलाच होता. बंडाची ही 'बखर' भारत सरकारने पुरस्कृत करावी असा अर्ज त्याने मागे केला होता त्याच्या संदर्भातच हे पत्र उघडपणे आलेले होते. रामपूरला या पुस्तकाची जी प्रत उपलब्ध होती, ती अर्थातच सरकारकडे पाठवण्याच्या लायकीची नव्हती. या पुस्तकाचे प्रकाशन सरकारतर्फे

झाल्यास खूपच मोठा आर्थिक व सामाजिक लाभ होईल अशी त्याची अपेक्षा असल्यामुळे त्याने ताबडतोब नव्या आवृत्तीची व्यवस्था केली आणि एक सुधारलेली प्रत बरेली येथील काही मित्रांकडे छपाईसाठी पाठवली. या दुसऱ्या आवृत्तीची एक प्रत त्याने पंजाब सरकारकडे पाठविली. सरकारने त्याच्यावर एका तज्ज्ञाकडून अहवाल मागवला. या तज्ज्ञाला बहुधा या पुस्तकाचा प्रतिपाद्य विषयच समजू शकला नाही किंवा त्याच्या शैलीचीही तो प्रशंसा करू शकला नाही. त्याने या पुस्तकावर प्रतिकूल अभिप्राय देऊन म्हटले की या पुस्तकाची भाषा ही प्राचीन फारशी असून त्यात अजिबात प्रचारात नसलेल्या व त्यामुळे अनाकलनीय झालेल्या अशा अनेक अरबी शब्दांचा भरणा आहे.

आपल्या अंतिम अहवालात गव्हर्नर जनरलने असा निर्णय घेतला की गालिबला आपल्या दरबारात राजकवी म्हणून नेमता येणार नाही, परंतु पंजाबच्या लेफ्टनंट गव्हर्नरला या प्रकरणाचा सहानुभूतिपूर्वक विचार करण्याची व गालिबला मानाचा विशेष पोशाख देण्याची किंवा आपल्या 'दरबार-प्रसंगी' जेव्हा तो हजर राहील तेव्हा त्याला वरचे आसन देण्याची मुभा राहील. शिवाय, सरकारी खर्चाने 'दस्तंबू' प्रकाशित करण्याने कोणताही उपयुक्त हेतू साध्य होणार नाही असेही ठरविण्यात आले. अशा प्रकारे गालिबच्या आणखी एका आशेचा भंग झाला.

यावेळी गालिब रामपूरला सुमारे दहा आठवडे राहिला. १८६५ च्या डिसेंबरअखेरीस त्याने दिल्लीसाठी प्रयाण केले. वाटेत त्याला भयंकर अपघात झाला. त्यावेळी खूप पाऊस पडत होता आणि नद्यांना पूर आलेला होता. मुरादाबादला पोचण्यापूर्वी त्याला नावेच्या पुलावरून रायगंगा पार करावी लागली. तो पालखीतून प्रवास करीत होता आणि त्याचे सर्व सामान-सुमान व नोकरचाकर बैलगाडीत होते. पूल ओलांडतो न ओलांडतो तोच पाण्याच्या लोंढ्याने पूल वाहून गेला व अशा रीतीने त्याच्या सोबत्यांशी त्याचा संबंध तुटला. मोठ्या प्रयासाने मुरादाबाद या पुढच्या मुक्कामाला तो कसाबसा पोचला. ऐन थंडीचे दिवस. रात्री अतिशय गारठा असे. त्याहीपेक्षा वाईट गोष्ट म्हणजे त्याच्यापाशी धड बिछाना व कपडे सुद्धा

नव्हते. आधीच खालावलेल्या त्याच्या प्रकृतीवर याचा अतिशय परिणाम झाला व तो भयंकर आजारी पडला. दुसरे दिवशी गालिब धर्मशाळेत उतरला असल्याची वार्ता सगळीकडे पसरली. त्याच्या ओळखीच्या तिथल्या न्यायाधीशाने आपल्या घरी येण्यासाठी गालिबचे मन वळवले. त्याने आवश्यक ती औषधपाण्याची मदत त्याच्यासाठी मिळवली व पाच दिवस त्याची शुश्रूषा केली. जेव्हा प्रवास करण्याइतपत त्याची स्थिती सुधारली तेव्हा त्याने पुन्हा प्रवास सुरू केला व १८६६ च्या जानेवारीच्या पहिल्या आठवड्यात तो दिल्लीला येऊन पोचला.

या दुर्दैवी अपघाताने गालिबची प्रकृती पूर्णपणे खालावली. आर्थिक दृष्टीनेही रामपूरचा त्याचा हा प्रवास यशस्वी ठरला नाही. हा खडतर प्रवास सुरू करण्यापूर्वीच त्याची प्रकृती यथातथाच होती व दिल्लीबाहेर जाण्याच्या स्थितीत तो नव्हता. तथापि, परिस्थितीमुळे त्याला तसे करणे भाग पडले व त्याने ही जोखीम पत्करण्याचा निर्णय घेतला. अनेक सावकारांचे मोठमोठाल्या रकमांचे त्याला देणे होते आणि रामपूर हेच त्याचे एकमेव आधारस्थान होऊ शकत होते. नवाब कल्ब अली खान हा स्वतः विद्वान साहित्यिकांचा व कवींचा एक महान आश्रयदाता होता. ही सारी वर्षे गालिब हा रामपूरचा राजकवी होता व दिवंगत नवाबाशी – कल्ब अली खानाच्या पित्याशी – त्याचे अतिशय घनिष्ठ संबंध होते. एरवी सुद्धा, राज्यारोहणप्रसंगी राज्यकर्त्याला पौर्वात्य परंपरेनुसार दरबाराशी व राजघराण्याशी संबंधित असलेल्या लोकांना मोठमोठाल्या रकमांचे दान करावे लागे. यामुळे गालिबच्या मनात आशेचा अंकुर फुटला असावा की नवाब कल्ब अली खानाकडून त्याला पुरेशी घवघवीत रक्कम मिळेल व तिने पूर्णतया जरी नाही तरी बव्हंशी विवंचना दूर होईल. उलट पक्षी, त्याचे सर्व औदार्य व कलासाहित्याला दिलेला आश्रय जमेस धरूनही, नवा नवाब पैसे खर्च करण्याच्या बाबतीत अतिशय दक्ष होता. त्याच्याभोवती लेखकांचे व कवींचे फार मोठे वर्तुळ होते. परंतु मिळवण्यासाठी त्यांच्यापैकी प्रत्येकाला सरकारात कोणत्या ना कोणत्या प्रकारचे काम करावे लागे. तो केवळ कवी किंवा लेखक आहे एवढ्यानेच ते त्याला मिळत

नसे. अशा परिस्थितीत गालिबला निराशा वाटणे अगदी स्वाभाविक होते. कोणतीही मोठी देणगी त्याच्या वाट्याला आली नाही, अथवा कोणतीही खास वागणूक त्याला मिळाली नाही. राज्यारोहणाच्या निमित्ताने १००० रु. ची भिकार रक्कम व प्रवासाला जाण्यापूर्वी प्रवासखर्च म्हणून २०० रु. एवढेच काय ते त्याच्यासाठी मंजूर करण्यात आले.

यानंतर, जणू काय आगीत तेल ओतावे त्याप्रमाणे गालिब दिल्लीला परतल्यावर या दोघांत भांडणाचा एक प्रसंग निर्माण झाला. या तरुण नवाबाने फारशी गद्याचा एक उतारा एका पुस्तकात प्रस्तावना म्हणून समाविष्ट करण्यायोग्य आहे की नाही हे पाहण्याची गालिबला विनंती केली. या लिखाणात नवाबाने काही वाक्प्रचार असे वापरले होते, जे भारतात रूढ असले तरी अभिजात फारशी लेखकांच्या वापरानुसार अनुरूप मानता येण्याजोगे नव्हते. त्याप्रमाणे गालिबने ते बदलले. नवाबाला जेव्हा प्रस्तावनेची दुरुस्त केलेली प्रत मिळाली व त्याने गालिबने केलेले बदल पाहिले, तेव्हा त्याने खुलासेवजा काही प्रश्न गालिबला विचारले व आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ काही भारतीय फारशी विद्वानांचा दाखला त्याबरोबर दिला. उभा जन्म भारतीय लेखकांची अजिबात कदर न करणाऱ्या गालिबने काहीशा फटकळ शब्दांत आपले मत व्यक्त करून त्यांची वासलात लावली. उलट पक्षी, नवाब हा परंपरावादी होता. त्याने गालिबची भाषा व तिचा सूर याबद्दल आक्षेप घेतला. परिणामी, दोघांत अप्रिय असे वादंग माजले. मग गालिबची पाचावर धारण बसली. यामुळे आपले मासिक वेतन बंद पडेल की काय अशी त्याला भीती वाटली. सरतेशेवटी त्याने नवाबाची काहीशी केविलवाणी शरणागती पत्करली. कल्ब अली खानाने आपल्या बाजूने हा वाद एकाएकी थांबवला, पण त्याने दुसरे टोक गाठले नाही. या दुर्दैवी प्रकरणाने इतःपर त्या दोघांतील साहित्यिक सल्लामसलत व देवाणघेवाणीबद्दलच्या सर्व आशा नष्ट झाल्या. काही इतर घटनांनीही हा गैरसमज बळावण्यास मदत केली. यानंतर त्याच्या होत्या नव्हत्या त्या सर्व अतिरिक्त देणग्या पूर्णपणे बंद झाल्या व यापुढे त्यांच्यातील संबंध निव्वळ औपचारिक राहिले, आत्मीयतेचे राहिले नाहीत.

**अखेर**

गालिबचा अंत आता झपाट्याने जवळ येत होता. बऱ्याच दिवसांपासून त्याची प्रकृती समाधानकारक नव्हती. रामपूरहून केलेल्या परतीच्या प्रवासात त्याला जो अपघात झाला होता त्याने त्याचा मृत्यू आणखी जवळ ओढवला. एरवी सुद्धा आर्थिक विपन्नावस्थेमुळे, पूर्वीचे राहणीमान राखण्याच्या स्थितीत तो नव्हता. बालपणी व तारुण्यात तो ऐषआरामाचे किंबहुना उधळेपणाचेच आयुष्य जगला होता. आयुष्याच्या उतरणीवर आल्यावर ब्रिटिश खजिन्यातून आणि रामपूरच्या नबाबाकडून जे मिळे तेवढ्यापुरतीच त्याची आमदनी मर्यादित झाली. या दरम्यान त्याच्या जबाबदाऱ्या, विशेषतः झैनुल अबीदिन खानाच्या दोन मुलांच्या आगमनापासून, अनेकपटींनी वाढल्या होत्या. अनेक दुखण्यांनी आता त्याला पछाडले होते. दीर्घकालीन बद्धकोष्ठामुळे नानातऱ्हेचे जटिल रोग उद्भवले होते. १८६२ व १८६३ साली त्याच्या अंगभर फोड व व्रण उठले होते, त्यामुळे तो कमालीचा अशक्त झाला. त्यातून बरा होताच, त्याला हर्नियाचा त्रास सुरू झाला आणि बहुधा मधुमेहाचीही संभावना झाली होती. त्याचा आहार अगदी जेमतेम झाला. बहुतेक वेळ तो घरातच घालवी व बाहेर पडत नसे. अशा परिस्थितीत त्याने जन्मभर केलेली साहित्यिक कार्ये तर सोडाच पण नित्याचा पत्र-व्यवहार सुद्धा पाहणे त्याच्याच्याने होत नसे. म्हणून त्याने दिल्लीला दोन प्रमुख साप्ताहिकांतून जाहीर निवेदन केले, त्यात कोणतेही साहित्यिक कार्य करण्याबद्दलच्या आपल्या असमर्थतेबद्दल खेद व्यक्त करून, आपल्या कविता दुरुस्तीसाठी त्याच्याकडे न पाठवण्याबद्दल मित्रांना व शिष्यांना त्याने विनवले होते. तरीही त्याच्या विनंतीकडे कुणीच लक्ष दिले नाही. त्याच्या मित्रांनी त्याला पत्रे पाठवणे चालूच ठेवले व त्यांचा समाचार त्याला घ्यावाच लागे.

आता त्याचा अंतकाल अतिशय समीप येऊन ठेपला होता. अशक्तपणा सतत वाढत होता. अधूनमधून तो बेशुद्ध पडे. यापुढे त्याला कोणतेही अन्न घेता येईनासे झाले. अशा परिस्थितीत असताना १४ फेब्रुवारी १८६९ रोजी त्याच्या मेंदूत रक्तस्राव सुरू झाला व त्यानंतर तो बेशुद्ध पडला.

त्यावेळी कोणतेही उपलब्ध असलेले उत्कृष्ट वैद्यकीय उपचार त्याला शुद्धीवर आणू शकले नाहीत, आणि दुसरे दिवशी, १५ फेब्रुवारी १८६९ रोजी मध्यान्ह उलटल्यावर त्याचे प्राणोत्क्रमण झाले. त्याच दिवशी सायंकाळी निझामुद्दीन या छोट्या गावी त्याचा देह नेण्यात आला व लोहारू परिवाराच्या दफनभूमीत त्याच्या देहाला चिरकालीन विश्रांती लाभली.

त्याच्याबरोबरच भारतातील अभिजात फारशीचा अखेरचा कवी नाहीसा झाला. त्याने उर्दू काव्याला एका नव्या मार्गावरून नेले. या मार्गाने जाऊनच पुढील कवींनी उर्दू काव्य नव्या उंचीवर नेले.

# २

## गालिबची कला

गालिबने अगदी फार लहानपणीच, केवळ ११ किंवा १२ वर्षांचा असतानाच, कविता लिहायला सुरवात केली. प्रारंभी त्याने 'असद' हे टोपणनाव वापरले. असदुल्लाखान हे नाव असणाऱ्याने हीच निवड करावी हे साहजिक आहे. पण त्याला पुढे असे कळून आले की याच टोपणनावाने लिहिणारा आणखीही दुसरा कवी होता. नावातील गोंधळ टाळण्यासाठी त्याने आपले नांव बदलून त्याऐवजी 'गालिब' ठेवले. ते सुद्धा स्वाभाविकच होते, कारण प्रेषित महंमदाचा जांवई अली याचे एक उपनाम 'असद अल्लाह-एल-गालिब' असे होते. या दिवसांत गालिब फारशी भाषेतही कविता लिहीत असे. या वस्तुस्थितीला पुष्टी देणारा पुरावा उपलब्ध असला, तरी त्याने आपला अधिकांश काळ उर्दूसाठी खर्च केला, यात संशय नाही.

१८२१ पावेतो उर्दूतील दीवान संग्रहित करता येईल इतक्या कविता त्याने लिहिलेल्या होत्या. प्रारंभिक अवस्थांत अवारतविक काव्य-वस्तूबद्दल व कृत्रिम शैलीबद्दल प्रसिद्ध असलेल्या काही विशिष्ट फारशी कवींचा त्याच्यावर विलक्षण पगडा होता. या काळातील गालिबच्या रचनातही हेच दोष आढळतात. या निष्फळ मार्गावरून जाण्याला त्याला कुणी पायबंद घालण्याचा प्रयत्न केला नाही, असे नाही. परंतु तो हटाग्रही व स्वमताभिमानी असल्यामुळे कोणत्याही प्रतिकूल टीकेला त्याने भीक घातली नाही. अनेक वर्षांनंतर जेव्हा तो दिल्लीला स्थायिक होऊन चुकला होता, तेव्हा त्याच्या काही अंतेवासी मित्रांनी ही शैली त्याने बदलावी, तसेच त्याच्या उर्दू दीवानातील सामान्य वाचकाला आवडतील अशा काही कवितांची निवड करावी असा आग्रह धरला. या हार्दिक व सौहार्दपूर्ण उपदेशाची त्याला उपेक्षा करता आली

नाही व मूळच्या दीवानातील बराच मोठा भाग, तो अधिक वाचनीय व्हावा म्हणून त्याने काढून टाकला.

हा दीवान प्रथम १८६१ साली प्रकाशित झाला. त्याचे प्रकाशन हा खरोखरीच उर्दू साहित्याच्या इतिहासातील एक परिवर्तन-बिंदू ठरला. ११०० पेक्षा कमी शेर असलेल्या या बारीक चोपड्याचा साधारणतः उर्दू भाषेवर, व विशेषतः उर्दू काव्यावर, एवढा दूरगामी परिणाम व्हावा, हे आश्चर्यजनक आहे. यानंतर गालिब पुढे २८ वर्षे जगला. परंतु या दीर्घ काळाच्या अखेरीसही दीवानातील शेरांची संख्या १८०० वर गेली नाही.

उर्दू ही अनेक भारतीय भाषांचे, विशेषतः 'खडी' व 'हरयाणी' भाषांचे, प्रत्यक्ष अपत्य होय. परिणामी तिच्या बहुतांश शब्दसंग्रहाचा स्रोत भारतीय आहे. या देशात मुसल्मानांच्या आगमनाबरोबर आलेल्या फारशी भाषेच्या लिपीची तिने उसनवारी केली. सुरवातीचे उर्दू लेखक हे निरपवाद-पणे फारशीत निष्णात होते व ते बहुधा धार्मिक मनोवृत्तीचे असत. त्यांनी जेव्हा उर्दूत लिहिण्यास सुरुवात केली तेव्हा साहजिकच अभिजात फारशी लेखकांच्या पावलाबरहुकूम त्यांनी आपली पावले टाकली. फारशी काव्यात सर्वांत महत्त्वाचे तीन प्रकार आहेत : 'गझल', 'कसीदा' व 'मथनवी'.

हे सर्व प्रकार, विशेषतः गझल, हे प्रेम, मदिरा व गूढवाद या विषयांनी ओतप्रोत भरलेले आहेत. अशा प्रकारे उर्दू काव्य अस्तित्वात येण्यापूर्वीच आकार (फॉर्म) व आशय यांविषयी जवळपास निश्चित परंपरा रूढ झाली होती. उर्दू कवींना या काव्य-प्रकारांच्या किंवा काव्य-विषयांच्या प्रभावापासून मुक्त होता आले नाही व त्यांनी त्यांचे अनुकरण करायला सुरवात केली. त्यामुळे अपरिहार्यपणे हे सर्व काव्य कृत्रिम व काल्पनिक बनले. या बाबतीत कवीचा अनुभव नावालाच असे. असे असून सुद्धा, तो एखाद्या जाणकार माणसाप्रमाणे लिही. त्याहीपेक्षा वाईट म्हणजे जीवनाच्या इतर असंख्य प्रश्नांकडे फार थोडे लक्ष दिले जाई. प्रेम, मदिरा व गूढवाद हे आपल्यापरीने अतिशय महत्त्वाचे विषय असतीलही. तरी सुद्धा जीवन पूर्णतः त्यांचेच बनलेले नाही, बनू शकत नाही. परिणाम असा झाला की इथले आपले

सर्व कवी आपापले स्वयंनिर्मित काल्पनिक जीवन जगत असत आणि त्यांचे पाय क्वचितच या भूतलावर टेकलेले असत.

या परिस्थितीविरुद्ध बंड करणारा पहिला कवी म्हणजे गालिब. आपल्या पूर्ववर्तीयांप्रमाणे त्यानेही काल्पनिक व अवास्तविक विषयांवर लिहिण्यास सुरवात केली होती. पण काही काळानंतर अशा प्रकारच्या काव्यातील पोकळपणा त्याला जाणवला व ते अधिक युक्तिसंगत करण्यासाठी त्याने त्यात एक नवा सूर छेडला. त्याने जीवनाबद्दल व त्याच्या बहुविध समस्यांबद्दल— उदा., मानव व त्याच्या निष्ठा व आंतरिक विचार, प्रेम, मानसिक क्रिया व प्रतिक्रिया व आपल्यापैकी प्रत्येकाच्या दैनंदिन अनुभवाच्या इतर कित्येक विषयांवर—त्याने लिहिले. अशा प्रकारे काव्य हे त्याच्या हातात दैनंदिन अनुभूतीतील भाष्याचे साधन बनले. साहजिकच त्याच्या काव्याने वाचकांस कितीतरी अधिक आनंदाची व आस्वादाची तीव्र जाणीव निर्माण करून दिली. त्याच्या पूर्ववर्तीयांनी घालून दिलेल्या दोनशे वर्षे पुराण्या परंपरांपासून त्याला पूर्णपणे मुक्त होता आले नाही, हे अगदी स्वाभाविक होते. त्याच्या दीवानात प्राचीन कवींपासून वारसा घेतलेल्या अशा अयथार्थ कवितेची उदाहरणे निश्चित सापडतात. परंतु त्याची थोरवी या गोष्टीत आहे की अशा काल्पनिक व आभासमय लेखन-प्रकाराचे वैयर्थ्य त्याने ओळखले, व त्याविरुद्ध उभे राहून नवा मार्ग शोधून काढण्याचे धैर्य दाखवले. गेल्या शतकात उर्दू काव्याने फार मोठी उंची गाठली आहे व अभिनंदनीय यश प्राप्त केले आहे. हे बऱ्याच प्रमाणात बाह्य जगताशी झालेल्या आपल्या संपर्कामुळे व पाश्चात्त्य भाषा व त्यांचे साहित्य यांच्या ज्ञानामुळे प्राप्त करून घेता आले, हे निःसंशय. परंतु जुनी पाळेमुळे तोडून विचाराच्या व ज्ञानाच्या अज्ञात प्रदेशाकडे नेण्याचा नवा मार्ग आपणांस दाखवला तो प्रथम गालिबनेच, हे आपण विसरू शकत नाही.

गालिबच्या काव्याची व विविध विषयांवरील त्याच्या विचारांची काही उदाहरणे येथे देत आहोत :

## गालिबचे काही निवडक शेर

### ईश्वर

महरम[1] नहीं है तू ही नवाहा-ए-राज़[2] का
यां वरना जो हिजाब है, पर्दा है साज़ का

मुंह न खुलनेपर, है वो आलम, कि देखा ही नहीं
ज़ुल्फ़[3] से बढ़कर, नक़ाब[4] उस शोख़ के मुंह पर खुला

उसे कौन देख सकता, कि यगाना[5] है वह यक़ता[6]
जो दुई[7] की बू भी होती तो कहीं दुचार[8] होता

न था कुछ, तो खुदा था, कुछ न होता, तो खुद होता
डुबोया मुझको होने ने, न होता मैं तो क्या होता

परतवे-ख़ुर[9] से है शबनम[10] को, फ़ना[11] की तालीम
मैं भी हूं, एक इनायत[12] की नज़र होने तक

है परे सरहदे-इदराक[13] से अपना मस्जूद[14]
क़िबले[15] को अहले-नज़र[16] क़िबला नुमा[17] कहते हैं

आराइशे-जमाल[18] से फ़ारिग[19] नहीं हनोज़[20]
पेशे-नज़र है आइना दाइम[21] नक़ाब में

---

१. मर्मज्ञ, दिव्य दृष्टीचा. २. रहस्याचे गूढ संगीत स्वर. ३. केसांची बट, केशकलाप. ४. पडदा, बुरखा. ५. अद्वितीय. ६. एकच एक, अनुपम. ७. द्वैत. ८. भेटणे, दिसणे. ९. सूर्याचे बिंब. १०. दव. ११. मृत्यू. १२. कृपा. १३. ज्ञान किंवा बुद्धीची सीमा. १४. पूजनीय देवता, ईश्वर. १५. काबा. १६. ज्ञानी, योगी. १७. संकेत मात्र, खूण. १८. सौंदर्य-प्रसाधन, शृंगार. १९. संपलेले, पूर्ण. २०. अजून. २१. नेहमी.

थक थक के, हर मुक़ाम पर दो चार रह गये
तेरा पता न पायें, तो नाचार[1] क्या करें

है वही बदमस्ति-ए-हरज़र्रा[2] का खुद उज्रख़ाह[3]
जिसके जल्वे[4] से ज़मीं ता आसमां सरशार[5] है

अपनी हस्ती[6] ही से हो जो कुछ हो
आगही[7], गर नही ग़फ़लत ही सही

कसरत आराइ-ए-वहदत[8] है, परस्तारि-ए-वहम[9]
कर दिया काफ़िर[10], इन असनामे-ख़याली[11] ने मुझे

हर चन्द हर एक शै[12] में तू है
पर तुझसी तो कोई शै नहीं है

## धर्म

लताफ़त[13] बे कसाफ़त[14] जल्वा पैदा कर नहीं सकती
चमन ज़ंगार[15] है आईना-ए-बादे-बहारी[16] का

हम मुव्वहिद[17] हैं, हमारा केश[18] है तर्के-रुसूम[19]
मिल्लतें[20] जब मिट गईं अज्ज़ा-ए-ईमां[21] हो गईं

---

१. उपाय नसलेला. २. प्रत्येक अणूची उन्मत्तता. ३. जबाबदार, उत्तरदायी. ४. सौंदर्य, शोभा. ५. परिपूर्ण. ६. अस्तित्व, जीवन. ७. चेतना. ८. एकत्वाचे अनेकरूपत्व. ९. कल्पनेची, भ्रमाची पूजा. १०. अधर्मी. ११. काल्पनिक प्रतिमा. १२. वस्तू, पदार्थ. १३. तरलता. १४. कठोरता, जडता. १५. आरशाच्या मागचा पृष्ठभाग, चौकट. १६. वसंताच्या वाऱ्याचा दर्पण. १७. एकेश्वरवादी. १८ धर्म, कर्तव्य. १९. विधींचा त्याग. २०. संप्रदाय, २१. धर्माचा भाग.

ताअत[1] में तो, रहे न मै-ओ-अंगबीं[2] की लाग
दोज़ख़[3] में डाल दो, कोई लेकर बहिश्त[4] को

मिटता है फ़ौते-.फ़ुर्सते-हस्ती[5] का ग़म कहीं
उम्रे अज़ीज़[6] सर्फ़े-इबादत[7] ही क्यों न हो

वफ़ादारी[8], बशर्ते-उस्तवारी[9], अस्ले-इमां[10] है
मरे बुतख़ाने में[11], तो काबे में गाड़ो ब्राम्हन को

सुनते हैं जो बहिश्त की तारीफ़, सब दुरुस्त
लेकिन .ख़ुदा करे, वो तेरी जल्वागाह[12] हो

देते हैं जन्नत[13], हयाते-दह्र[14] के बदले
नश्शा बअंदाज़ा-ए-ख़ुमार[15] नहीं है

हमको मालूम है, जन्नत की हक़ीक़त, लेकिन
दिल के ख़ुश रखने को, 'ग़ालिब' यह ख़याल अच्छा है

नाकरदा[16] गुनाहों की भी हसरत की मिले दाद
या रब[17], अगर इन करदा[18] गुनाहों की सज़ा है

क्या फ़र्ज़ है, कि सबको मिले एक-सा जवाब
आओ न, हम भी सैर करें कोहे-तूर[19] की

---

१. उपासना. २. मदिरा व मधू. ३. नर्क. ४. स्वर्ग. ५. जीवनाचा हळूहळू होणारा अंत. ६. प्रिय, प्यार. ७. पूजा करण्यात व्यतीत. ८. श्रद्धा, निष्ठा. ९. स्थिर राहील या शर्तीसह. १०. सत्य धर्म. ११. मंदिरात. १२. दर्शन-स्थल. १३. स्वर्ग, नंदनवन. १४. इहलोकीचे जीवन. १५. पिपासेच्या तोडीचे. १६. न केलेल्या. १७ रब=ईश्वर, या रब=हे ईश्वरा. १८. केलेल्या. १९. जेथे प्रेषित मोझेसला ईश्वरी प्रकाशाचे दर्शन झाले होते तो सायनाई पर्वत.

क्या ज़ुहूद[१] को मानूं, कि न हो गरचे रियाई[२]
पादाशे-अमल[३] की तम-ए-ख़ाम[४] बहुत है

## रहस्यवाद

मक़सद है नाज़ो-ग़म्ज़ा[५], वले[६] गुफ्तगूं में, काम
चलता नहीं है दश्न[७]-ओ-खंजर[८] कहे बिग़ैर

हरचन्द, हो मुशाहिद-ए-हक़[९] की गुफ्तगू
बनती नहीं है, बादा-ओ-साग़र[१०] कहे बिग़ैर

अस्ले-शुहूदो-शाहिदो-मशहूद[११] एक है
हैरां हूं, फिर मुशाहिदा[१२] है किस हिसाब में

है मुश्तमिल[१३] नुमूदे-सुवर[१४] पर वुजूदे-बहर[१५]
यां क्या धरा है क़तर-ओ-मोजो-हबाब[१६] में

है ग़ैबे-ग़ैब[१७], जिसको समझते हैं हम शुहूद[१८]
हैं ख़्वाब[१९] में हनोज़[२०], जो जागे हैं ख़्वाब में

हां, खाइयो मत फ़रेबे-हस्ती[२१]
हर चन्द कहें, कि है, नहीं है

बाज़ीच[२२]-ए-अत्फ़ाल[२३] है दुनिया मेरे आगे
होता है शबो-रोज़[२४] तमाशा, मेरे आगे

---

१. धार्मिकता, धर्माचरण. २. देखावा, वरपांगीपणा. ३. कर्म-फल. ४. खोटी अभिलाषा. ५. विभ्रम व नखरे. ६. परंतु. ७. कट्यार. ८. खंजीर. ९. ईश्वराचे सर्वसाक्षित्व. १०. मद्य व प्याला. ११. दर्शन, द्रष्टा व दृश्य. १२. दृश्य. १३. अवलंबून, निर्भर, अंतर्भूत. १४. रूप व आकार. १५. सागराचे अस्तित्व. १६. थेंब, लाटा व बुडबुडा. १७. भ्रम, माया. १८. दृश्यमान, दृश्य. १९. स्वप्न. २०. अजून. २१. जीवनाचे चक्र किंवा मायाजाल २२. खेळ. २३. लहान मुले. २४. रात्रंदिवस.

इक खेल है औरंगे[1]-सुलेमां, मेरे नज़दीक
इक बात है ऐजाज़े-मसीहा[2], मेरे आगे

जुज़[3] नाम नहीं सूरते-आलम[4] मुझे मंज़ूर
जुज़ वहम[5], नहीं हस्ति[6]-ए-अशिया[7] मेरे आगे

ईमां[8] मुझे रोके है, तो खेंचे है मुझे कुफ्र[9]
काबा मेरे पीछे है, कालीसा[10] मेरे आगे

## जीवन

तेशे[11] बिग़ैर मर न सका कोहकन[12], 'असद'
सरगश्त[13]-ए-खुमारे[14]-रुसूमो[15] कुयूद[16] था

दह्र[17] में नक़्शे-वफ़ा[18] वजहे-तसल्ली न हुआ
है यह वो लफ्ज़[19] कि शर्मिन्द-ए-मानी[20] न हुआ

यह कहां की दोस्ती है, कि बने हैं दोस्त, नासेह[21]
कोई चारासाज़[22] होता, कोई ग़मगुसार[23] होता

रगे-संग[24] से टपकता, वो लहू, कि फिर न थमता
जिसे ग़म समझ रहे हो, यह अगर शरार[25] होता

---

१. सिंहासन. २. येशूचे चमत्कार. ३. शिवाय, अतिरिक्त. ४. सृष्टी, दृश्यमान जगत. ५. भ्रम, संशय. ६. अस्तित्व. ७. वस्तू. ८. श्रद्धा, धर्म. ९. अधर्म. १०. चर्च, गिरिजाघर. ११. कुदळ, कुन्हाड. १२. फरिहाद. १३. उन्मत्त, वेडा झालेला. १४. नशा, मद. १५. रीतिरवाज. १६. कैद. १७. जग. १८. निष्ठेची मूर्ती, मूर्तिमंत निष्ठा. १९. शब्द २०. सार्थ. २१. उपदेशक २२. सहानुभूती दाखवणारा. २३. दुःखावर इलाज करणारा. २ . दगडाच्या रेषा. २५. ठिणगी, आग.

ग़म अगरचे जांगुसिल[१] है प कहाँ बचें, कि दिल है
ग़मे इश्क़ गर न होता, ग़मे-रोज़गार होता

हिनां[२]-ए-पा-ए-खज़ां[३] है, बहार अगर है यही
दवामे-कुलफ़ते-खातिर[४] है ऐश दुनिया का

दरमान्दगी[५] में 'ग़ालिब', कुछ बन पड़े तो जानूं
जब रिश्ता बेगिरह[६] था, नाखुन गिरह कुशा[७] था

हुआ जब ग़म से यूं बेहिस[८], तो ग़म क्या सर कटने का
न होता गर जुदा तन से, तो ज़ानूं[९] पर धरा होता

इशरते[१०]-क़तरा[११] दरिया में फ़ना[१२] हो जाना
दर्द का हद से गुज़रना, है दवा हो जाना

हुआ हूं इश्क़ की ग़ारतगरी[१३] से शरमिन्दा
सिवाए हसरते-तामीर[१४] घर में खाक नहीं

क़ैदे-हयातो-बंदे-ग़म[१५], अस्ल में दोनों एक हैं
मौत से पहले, आदमी ग़म से नजात[१६] पाये क्यों

हसद[१७] से दिल अगर अफ़सुर्दा[१८] है, गर्मे-तमाशा[१९] हो
कि चश्मे-तंग[२०], शायद, कसरते-नज़्ज़ारा[२१] से वा हो

---

१. प्राणघातक. २. मेंदी, शिशिर. ३. दीर्घकालीन ४. मनोव्यथा. ५. आपत्ती, क्लेश. ६. गाठीशिवाय. ७. गाठी सोडणारा. ८. बधिर, चेतनाशून्य. ९. गुडघा. १०. आनंद. ११. थेंब. १२. नाश, मृत्यू. १३. लूट, उध्वस्तता. १४. पुनर्निर्माण करण्याची आकांक्षा. १५. जीवनाची कैद व दुःखाचे बंधन. १६. मुक्तता. १७. मत्सर, असूया. १८. व्यथित, जखमी. १९. तमाशात मग्न. २०. संकुचित दृष्टी. २१. विपुल दृश्ये, विशाल वातावरण.

'ग़ालिब', कुछ अपनी सई[1] से लहना[2] नहीं मुझे
ख़िरमन[3] जले अगर न मलख़[4] खाये किश्त[5] को

न लुटता दिन को, तो कब रात को यों बेख़बर सोता
रहा खटका न चोरी का, दुआ देता हूं रहज़न[6] को

जब मैकदा[7] छुटा तो, फिर अब क्या जगह की कैद
मस्जिद हो, मदरसा[8] हो, कोई ख़ानक़ाह[9] हो

किया ग़मख़्वार[10] ने रुस्वा[11], लगे आग इस मुहब्बत को
न लावे ताब[12] जो ग़म की, वो मेरा राज़दां[13] क्यों हो

क़फ़स[14] में, मुझसे रुदादे-चमन[15] कहते, न डर, हमदम
गिरी है जिस पे कल बिजली, वो मेरा आशियां क्यों हो

रहिये अब ऐसी जगह चलकर, जहां कोई न हो
हम सुखन[16] कोई न हो, हम ज़ुबां[17] कोई न हो

बेदरो-दीवार[18] सा इक घर बनाया चाहिये
कोई हमसाया[19] न हो, और पासबां[20] कोई न हो

पड़िये गर बीमार, तो कोई न हो तीमारदार[21]
और अगर मर जाइये, तो नौहा ख़्वां[22] कोई न हो

---

१. प्रयत्न. २. भाग्यात. ३. पिके. ४. टोळ. ५. शेती, पिके. ६. चोर. ७. मदिरालय, मधुशाळा. ८. शाळा. ९. दरगा, मठ. १०. सहानुभूती दाखवणारा, हमदर्द. ११. अपकीर्ती, फजीती. १२. सामर्थ्य. १३. मित्र, रहस्य जाणणारा. १४. पिंजरा. १५. नंदनवन बागेतील हकीकत. १६. बोलणारा. १७. संभाषण करणारा. १८. बिना दारे-भिंतींचे. १९. शेजारी. २०. रखवालदार. २१. शुश्रूषा करणारा. २२. अश्रू ढाळणारा, रडणारा.

जी जले ज़ौक़े[1]-फ़ना[2] की नातमामी[3] पर न क्यों
हम नहीं जलते, नफ़स[4] हरचन्द आतशबार[5] हैं

ख़ज़ां क्या, फ़स्ले-गुल[6] कहते हैं किसको, कोई मौसम हो
वही हम हैं, क़फ़स है, और मातम बालो-पर[7] का है

मक़दूर[8] हो तो ख़ाक से पूछूं कि ऐ लईम[9]
तूने वो गंजहा-ए-गिरांमाया[10] क्या किये

न सुनो, गर बुरा कहे कोई
न कहो, गर बुरा करे कोई

रोक लो, गर ग़लत चले कोई
बख़्श[11] दो, गर ख़ता[12] करे कोई

कोन है, जो नहीं है हाजतमन्द[13]
किसकी हाजत[14] रवा[15] करे कोई

हज़ारो ख़्वाहिशें[16] ऐसीं कि हर ख़्वाहिश पर दम निकले
बहुत निकले मेरे अरमां लेकिन फिर भी कम निकले

ने तीर कमां में है, न सैयाद[17] कमीं[18] में
गोशे[19] में क़फ़स[20] के, मुझे आराम बहुत है

---

१. उत्साह, आनंद. २. मृत्यू, नाश. ३. अपूर्णता, ४. श्वासोच्छ्वास. ५. अग्नीचा वर्षाव करणारा, जाळणारा. ६. वसंत. ७. केस आणि पंख. ८. सामर्थ्य, ताकद. ९. कृपण. १०. मौल्यवान संपत्तीचा साठा. ११. क्षमा. १२. चूक. १३. इच्छा बाळगणारा. १४. इच्छा. १५. पुरी करणे. १६. उत्कट इच्छा. १७. शिकारी. १८. शिकाऱ्याची लपण्याची जागा, दबा. १९. कोपरा. २०. पिंजरा.

## मानव

गिरनी थी हम पे बर्क़े-तजल्ली[1], न तूर पर
देते हैं बादा,[2] ज़र्फ़े-क़दहख़्वार[3] देखकर

क़तरा अपना भी हक़ीक़त में है दरिया, लेकिन
हमको तक़लीदे-तुनुक[4] ज़र्फ़िए-मंसूर[5] नहीं

दोनों जहान[6] देके वो समझे, यह ख़ुश रहा
यां आ पडी है शर्म, कि तकरार क्या करें

क्या शमा के नहीं हैं हवाख़्वाह अहले-बज़्म[7]
हो ग़म ही जां-गुदाज़[8] तो ग़मख़्वार[9] क्या करें

सब कहां, कुछ लाल-ओ-गुल[10] में नुमायां[11] हो गईं
ख़ाक में क्या सूरतें होंगी, कि पिन्हां[12] हो गईं

याद थी, हमको भी, रंगारंग बज़्म-आराइयां[13]
लेकिन अब नक्शो-निगारे-ताक़े-निसिया[14] हो गईं

उतना ही मुझ को अपनी हक़ीक़त से बेद[15] है
जितना कि वहमे-ग़ैर[16] से हूं पेचो-ताब[17] में

---

१. कृपेची वीज. २. मद्य. ३. मदिरा पिणाऱ्याची ताक़द. ४. कमताकदीचे अनुकरण. ५. मंसूरची क्षमता. ६. इहलोक व परलोक हे दोन्ही लोक. ७. मैफलीत जमणारे मित्र. ८. जीव जाळून टाकणारे. ९. दुःखात सहभागी होणारा. १०. गुलाब व फुले. ११. प्रकट, व्यक्त. १२. नष्ट. १३. मैफिलीची सजावट. १४. विस्मृतीच्या कोनाड्यावरील वेलबुट्टी. १५. दूर, अंतर. १६. मिथ्या भ्रम. १७. सांसारिक समस्या.

## जीवनविषयक तत्त्वज्ञान

मिरी तामीर में[1] मुज़्मर[2], है इक सूरत खराबी की
हयूला[3] बर्क़े[4]-ख़िरमन[5] का है, खूने-गर्म देहक़ा[6] का

सरापा[7] रेह् ने-इश्क़ो-नागुज़ीरे उल्फ़ते-हस्ती[8]
इबादत[9] बर्क़ की करता हूं और अफ़सोस हासिल का

है, ख़याले-हुस्न[10] में हुस्ने-अमल[11] का सा ख़याल
ख़ुल्द[12] का इक दर है, मेरी गोर[13] के अंदर खुला

बस कि दुश्वार[14] है, हर काम का आसां होना
आदमी को भी मुयस्सर[15] नहीं इन्सां होना

हवस[16] को है नशाते-कार[17] क्या क्या
न हो मरना तो जीने का मज़ा क्या

दिले-हर क़तरा है साज़े-अनलबह्र[18]
हम उसके हैं, हमारा पूछना क्या

क़तरे में दजला[19] दिखाई न दे और जुज़्व[20] में कुल
खेल लड़कों का हुआ, दीद-ए-बीना[21] न हुआ

---

१. रचनेत, निर्मितीत. २. लपलेली. ३. आकार, रूप. ४. बीज. ५. पिके, शेत. ६. शेतकरी, किसान. ७. आपादमस्तक. ८. जगण्याची अनिवार्य अभिलाषा. ९. आराधना, पूजा. १०. सौंदर्याचा विचार. ११. सुंदर कृत्ये. १२. स्वर्ग. १३ कबर. १४. कठीण. १५. सोपे. १६. हौस, महत्त्वाकांक्षा. १७. कार्याचा आनंद, अभिलाषा. १८. एक अरबी वाक्य; अर्थ: मीच सागर आहे (अहं ब्रह्मास्मि). १९. नदी, समुद्र. २०. अंश, हिस्सा. २१. दूरदृष्टी, अंतर्दृष्टी.

जान दी, दी हुई उसी की थी
हक़ तो यह है, कि हक़ अदा न हुआ

तौंफीक़[1] बअन्दाज़े-ए-हिम्मत[2] है अज़ल[3] से
आंखो में है वो क़तरा, कि गोहर[4] न हुआ

है आदमी बजाए खुद, इक महशरे-खयाल[5]
हम अंजुमन[6] समझते हैं, खल्वत[7] ही क्यों न हो

रात दिन, गर्दिश[8] में हैं सात आस्मां[9]
हो रहेगा कुछ न कुछ, घबरायें क्या

उम्रभर देखा किये मरने की राह[10]
मर गए पर देखिये, दिखलाए क्या

दामे[11] हर मौज[12] में है, हल्क़-ए-सदकाम[13] निहंग[14]
देखें क्या गुज़रे हैं क़तरे पे, गुहर होने तक

यह नज़र बेश नहीं फुर्सते-हस्ती[15] ग़ाफिल,
गर्मि-ए-बज़्म[16] है, इक रक्से-शरर[17] होने तक

ग़मे-हस्ती का, 'असद' किससे हो जुज़[18] मर्ग इलाज
शमा हर रंग में जलती है सहर[19] होने तक

---

१. सामर्थ्य. २. हिमतीच्या अनुसार. ३. अनादिकाल. ४. मोती. ५. असंख्य विचारांची गर्दी, समूह. ६. मैफिल, समाज. ७. एकान्त. ८. चक्राकार फिरणे. ९. तारे, आकाश. १०. वाट. ११. जाळे. १२. लाट. १३. शेकडो तोंडांचे. १४. मगर, नक्र. १५. आयुष्याचा. १६. मैफलीतील गर्मी, मौज. १७. ठिणगीचे नृत्य किंवा दीपज्योतीचे नृत्य. १८. शिवाय. १९. मृत्यू.

की वफा हम से, तो ग़ैर उसको जफा[1] कहते हैं
होती आई है, कि अच्छों को बुरा कहते हैं

रौ[2] में है रख़्शे-उम्र[3], कहाँ देखिये, थमे
नै हाथ बाग[4] पर है न पा हैं रिकाब में

अहले-बीनश[5] को, तूफाने-हवादिस[6], मकतब[7]
लतम-ए-मौज[8] कम अज़ सैलि-ए-उस्ताद[9], नहीं

रंज से ख़ूगर[10] हुआ इंसां, तो मिट जाता है रंज
मुश्किलें मुझ पर पड़ीं, इतनी, कि आसां हो गईं।

हंगाम-ए-ज़बूनि-ए-हिंमत[11] है इंफआल[12]
हासिल न कीजे दहूर से, इबरत[13] ही क्यों न हो

कार गाहे-हस्ती[14] में लाला दाग़[15] सामा है
बर्क़े-खिरमने-राहत[16], ख़ूने-ग़र्म-दहक़ा[17] है

क़तरा दरिया में जो मिल जाय, तो दरिया हो जाय
काम अच्छा है वो, जिसका कि मआल[18] अच्छा है

एक हंगामे[19] पे मौक़ूफ़[20] है घर की रौनक़
नौह-ए-ग़म[21] ही सही, नग्म-ए-शादी[22] न सही

---

१. अन्याय, जुलूम. २. भरधाव, तुफान वेग. ३. आयुष्याचा वारू. ४. लगाम. ५. दूरदृष्टी असणारा, योगी. ६. आपत्तीचे तुफान. ७. शाळा. ८. लाटांचे प्रहार. ९. गुरूंची चपराक. १०. सवय असलेला, अभ्यास. ११. हिंमतीच्या कमतरतेचा काळ. १२. उपकार, ऋण. १३. धडा, बोध. १४. अस्तित्वाचे कार्यक्षेत्र, सृष्टी. १५. कंदपुष्पा-(Tulip)वरील डाग. १६. सुखसमाधानाच्या शेतावर पडलेली वीज. १७. शेतकरी. १८. शेवट. १९. गडबड-गर्दी. २०. अवलंबून. २१. शोकगीत. २२. आनंदाचे गीत.

रहा आबाद आलम, अहले-हिम्मत[1] के न होने से
भरे हे जिस क़दर जामो-सुबू[2] मेख़ाना[3] ख़ाली है

हैं अहले-ख़िरद[4] किस रविशे-ख़ात[5] पे नाज़ां
पा-बस्तगि[6]-ए-रस्मो-रहे-आम[7] बहुत है

नज़र में है हमारी जाद-ए-राहे-फ़ना[8] 'ग़ालिब'
कि यह शीराज़ा[9] है, आलम के अज़्ज़ा-ए-परीशां[10] का

## प्रेम

कहते हो, न देंगे हम, दिल अगर पड़ा पाया
दिल कहा, कि गुम कीजे, हमने मुद्दआ[11] पाया

इश्क़ से, तबीअत नें, जीस्त[12] का मज़ा पाया
दर्द की दवा पाई, दर्दे-बेदवा पाया

सादगी[13]-ओ-पुरकारी[14] बेख़ुदी[15]-ओ-हुशियारी
हुस्न को तग़ाफ़ुल[16] में, जुरअत-आज़मा[17] पाया

बू-ए-गुल, नाल-ए-दिल[18] दूदे-चिराग़े-महफ़िल[19]
जो तेरी बज़्म से निकला, सो परीशां निकला

---

१. साहसी माणसे. २. मधुपात्र व मधुकलश. ३. मदिरालय. ४. बुद्धिमान लोक. ५. विशेष कृत्ये, आचरण. ६. बंधन. ७. सामान्य रीतिरिवाज. ८. अंतिम विनाशाचा मार्ग. ९. एकत्र आणणारा, निरनिराळे भाग सांधणारा. १०. विखुरलेले तुकडे. ११. अर्थ, तात्पर्य. १२. जीवन जगणे. १३. साधेपणा. १४. धूर्तपणा. १५. बेसावधपणा, आत्मविस्मृती. १६. उपेक्षा. १७. साहसाची परीक्षा. १८. दु:खाचा आक्रोश, विलाप. १९. मैफलीतील दिव्याचा धूर.

मैंने चाहा था कि अन्दोहे-वफा[1] से छूटूं
वो सितमगर[2] मेरे मरने पर भी राज़ी न हुआ

किया आईना-खाने का वो नक्शा तेरे जलवे ने
करे, परतवे-खुर्शीद[3] आलम शबनमिस्तां[4] का

ताराजे-काविशे-ग़मे-हिज़रां[5] हुआ, 'असद',
सीना, कि था दफीना[6] गुहरहा-ए-राज़[7] का

वाए दीवानगी-ए-शोक़[8] कि हरदम मुझ को
आप जाना उधर, और आप ही हैरां होना

की मेरे क़त्ल के बाद, उसने जफा[9] से तौबा
हाय, उस ज़ूद पशेमां[10] का पशेमां होना

बेनियाज़ी[11] हद से गुज़री, बन्दा परवर कब तलक
हम कहेंगे हाले-दिल, और आप फरमायेंगे क्या

गर किया नासेह[12] ने हमको क़ैद, अच्छा, यूं सही,
ये जुनूनें-इश्क़[13] के अंदाज़ छूट जायेंगे क्या

ये न थी हमारी क़िस्मत, कि विसाले-यार[14] होता
अगर और जीते रहते, यही इन्तज़ार होता

---

१. निष्ठेने राहण्याच्या यातना. २. छळवाद करणारी, निष्ठुर ३. सूर्याचे बिंब. ४. दवबिंदू. ५. वियोगाच्या दु:खाने दग्ध. ६. आगर, साठा. ७. ज्ञानरूपी मौक्तिकांचे भांडार. ८. प्रेमवेडेपणा. ९. अन्याय, जुलूम. १०. जल्द पश्चात्ताप पावणारा. ११. बेपर्वाई, उपेक्षा. १२. धर्मोपदेशक. १३. प्रेमाची आसक्ती. १४. प्रियेचे मीलन.

कोई मेरे दिलसे पूछे, तेरे तीरे-नीमकश[१] को
यह खलिश[२] कहां से होती, जो जिगर के पार होता

बला-ए-जां[३] है 'गालिब', उनकी हर बात
इबारत[४] क्या, इशारत[५] क्या, अदा[६] क्या

दर्द मिन्नतकशे[७]-दवा न हुआ
मैं न अच्छा हुआ, बुरा न हुआ

गो मैं रहा रहीने-सितमहा-ए-रोज़गार[८]
लेकिन तेरे ख़याल से ग़ाफिल नहीं रहा

लाग[९] हो, तो उसको हम समझें लगाव[१०]
जब न हो कुछ भी, धोका खायें क्या!

बहरा हूं मैं, तो चाहिये दूना इल्तिफात[११]
सुनता नही हूं बात, मुकर्रर[१२] कहे बिग़ैर

आह[१३] को चाहिये इक उम्र, असर होते तक
कौन जीता हे तेरी जुल्फ़ के सर होते तक़।

हमने माना, कि तग़ाफ़ुल[१४] न करोगे, लेकिन
ख़ाक हो जायेंगे हम, तुमको ख़बर होते तक।

कब से हूं, क्या बताऊं, जहाने-ख़राब में
शबहा-ए-हिज्र[१५] को भी रखूं गर हिसाब में।

---

१. अर्धवट खेचलेला तीर. २. वेदना. ३. जिवावरचे संकट. ४. बोलणे. ५. संकेत, इशारे. ६. विभ्रम, हावभाव. ७. औषधाचा आभारी. ८. सांसारिक अत्याचाराची शिकार. ९. संघर्ष, भांडण. १०. आसक्ती, प्रेम. ११. अनुग्रह, कृपा. १२. दोनदा. १३. (प्रेमाचा) निःश्वास. १४. उपेक्षा. १५. विरहाच्या रात्री.

क़ासिद[1] के आते आते, ख़त इक और लिख रखूं
मैं जानता हूं, जो वो लिखेंगे जवाब में

मुझ तक कब उनकी बज़्म में आता था दौरे-जाम[2]
साक़ी ने कुछ मिला न दिया हो शराब मैं

लाखों लगाव, एक चुराना निगाह का
लाखों बनाव, एक बिगड़ना इताब[3] में

ख़्वाहिश को, अहमकों[4] ने, परस्तिश[5] दिया क़रार
क्या पूजतां हूं उस बुते-बेदादगर[6] को मैं

नाला[7] जुज़[8] हुस्ने-तलब[9], ऐ सितम-ईजाद[10] नहीं
है तक़ाज़ा-ए-जफा[11] शिकवा-ए-बेदाद[12] नहीं

वो आयें घरमें हमारे, खुदा की क़ुदरत है
कभी हम उनको, कभी अपने घर को देखतें हैं

सब रक़ीबों[13] से हों नाखुश, पर जनाने-मिस्र[14] से
है जुलैख़ा खुश, कि महवे-ए-कन्आन[15] हो गई

नींद उसकी है, दिमाग़ उसका है, रातें उसकीं हैं
तेरी जुल्फ़ें, जिसके बाज़ू पर, परीशां[16] हो गई

१. जासूद, पत्रवाहक. २. मद्याचा प्याला. ३. क्रोध. ४. मूर्खांनी. ५. भक्ती, पूजा. ६. निष्ठुर मूर्ती. ७. आक्रोश, आक्रदन, रडणे. ८. फक्त, शिवाय. ९. मागण्याची खुबी. १०. निष्ठुर, जुलमी व्यक्ती. ११. जुलूम करण्याचे आवाहन. १२. जुल्माची तक्रार. १३. प्रतिस्पर्धी. १४. मिसर देशातील स्त्रिया. १५. कनानच्या चंद्रावर मुग्ध. १६. विखुरलेले, अस्ताव्यस्त.

बे इश्क़ उम्र कट नहीं सकती, और यां
ताक़त बक़द्रे-लज़्ज़ते-आज़ार[१] भी नहीं

हां वो नहीं खुदा परस्त[२], जाओ वो बेवफ़ा सही
जिसको हो दीनो-दिल[३] अज़ीज़[४], उस की गलीमें जाएं क्यों

वारस्ता[५] इससे हैं, कि मुहब्बत क्यों न हो
कीजे हमारे साथ, अदावत[६] ही क्यों न हो

है मुझको तुझसे तज़्किर[७]-ए-ग़ैर[८] का गिला
हर चन्द बर सबीले-शिकायत[९] ही क्यों न हो

जान कर कीजे तग़ाफ़ुल[१०] कि कुछ उम्मीद भी हो
यह निगाहे-ग़लत-अन्दाज़[११] तो सम[१२] है हमको

किसी को देके दिल कोई नवा संजेफ़ुग़ां[१३] क्यों हो
न हो जब दिल ही सीने में, तो फिर मुंहमें ज़ुबां क्यों हो

वो अपनी[१४] खून छोडेंगे, हम अपनी वज़्ज़[१५] क्यों बदलें
सुबुक सर[१६] बनके क्या पूछें कि हमसे सरगिरां[१७] क्यों हो

वफ़ा कैसी, कहां का इश्क़, जब सर फोड़ना ठहरा
तो फिर, ऐ संग[१८] दिल, तेरा ही संगे-आस्तां[१९] क्यों हो

---

१. दुःख भोगण्याएवढी. २. देवभीरू. ३. धर्म व दिल. ४. प्रिय. ५. बेपर्वा. ६. वैर. ७. उल्लेख, आठवण. ८. परका प्रतिस्पर्धी. ९. तक्रारीच्या स्वरूपात. १०. उपेक्षा. ११. चुकून टाकलेली दृष्टी. १२. विष. १३. आरडाओरडा, तक्रार. १४. सवय. १५. स्वाभिमान. १६. कमीपणा, अप्रतिष्ठा. १७. रुष्ट. १८. पाषाण. १९. उंबरठ्याचा दगड.

न करता काश नाला, मुझ को क्या मालूम था हमदम
कि होगा बाइसे[1]-अफज़ाइशे[2]-दर्दे-दुरु[3] वो भी

मेरे दिल में है, 'गालिब' शौक़े-वस्लो[4]-शिकवा[5]-ए-हिजरा[6]
खुदा वो दिन करे कि उससे मैं यह भी कहूं, वो भी

'ग़ालिब', तेरा अहवाल सुना देंगे हम उनको
वो सुनके बुलालें, यह इजारा[7] नहीं करते

मुझसे मत कह, तू हमें कहता था अपनी ज़िंदगी
ज़िंदगी से भी मेरा जी इन दिनों बेज़ार है

क़ता[8] कीजे न ताल्लुक़[9] हम से
कुछ नहीं है, तो अदावत[10] ही सही

हम भी दुश्मन तो नहीं हैं अपने
ग़ैर को तुझसे मुहब्बत ही सही

देखना क़िस्मत, कि आप अपने पे रश्क़[11] आ जाए हैं
मैं उसे देखूं, भला कब मुझसे देखा जाये है

हाथ धो दिलसे, यही गर्मी गर अन्देशेमें[12] है
आबगीना[13] तुन्दि-ए-सहबा[14] से पिघला जाये है

गरचे है तर्ज़े-तग़ाफुल[15] पर्दादारे-राज़े-इश्क़[16]
पर हम ऐसे खोये जाते हैं, कि वो पा जाए हैं

---

१. कारण. २. वाढणे. ३. मनोव्यथा. ४. मीलन. ५. तक्रार. ६. विरह, आंतरिक दुःख. ७. खात्री, ग्वाही. ८. तोडणे, ९. संबंध. १०. वैर. ११. मत्सर, हेवा. १२. विचार. १३. काचेचे भांडे. १४. मद्याची तीव्रता. १५. बेपर्वाईची वागण्याची तऱ्हा. १६. प्रेमाचे गुपित लपविणारा.

तस्कीं[1] को हम न रोयें, जो ज़ौक़े-नज़र[2] मिले
हुराने-खुल्द[3] में तेरी सूरत मगर मिले

अपनी गलीमें, मुझको न कर दफ़न, बादे क़त्ल
मेरे पतेसे ख़ल्क़[4] को क्यों तेरा घर मिले

ऐ साकिनाने-कूच-ए-दिलदार[5] देखना
तुमको कहीं जो 'ग़ालिब' आशुफ़्ता-सर[6] मिले

आतशे-दोज़ख़[7] में, यह गर्मी कहां
सोज़े-ग़महां-ए-निहानी[8] और है

बारहा देखी हैं उनकी रंजिशें[9]
पर कुछ अब के सरगिरानी और है

ने मुशद-विसाल[10] न नज़्ज़ार-जमाल[11]
मुद्दत हुई, कि अश्ति[12]-ए-चश्मो[13]-गोश[14] है

हुस्ने-मह,[15] गरचे बहंगामे-कमाल,[16] अच्छा है
उससे मेरा महे[17]-खुर्शीद[18] जमाल[19] अच्छा है

उनके देखे से, जो आ जाती है मुंह पे रौनक़[20]
वो समझते हैं कि बीमार का हाल अच्छा है

---

१. समाधान. २. दृष्टि-सुख. ३. स्वर्गातील अप्सरा. ४. लोक, समाज. ५. माझ्या प्रेयसीच्या आळीत राहणाऱ्यांनो. ६. वेडा झालेला, डोके फिरलेला. ७. नरकातील आग. ८. दुःखाने हृदयात पेटलेली आग. ९. राग-संताप, रुसणे-फुगणे. १०. मीलनाची शुभवार्ता. ११. सौंदर्याचे दर्शन. १२. सलोखा, मैत्री. १३. डोळे. १४. कान. १५. चंद्राचे सौंदर्य. १६. पूर्णिमेच्या वेळी. १७. चंद्र. १८. सूर्य. १९ सौंदर्य, रूप २०. शोभा, कळा, टवटवी.

न हुई गर मेरे मरने से तसल्ली,[१] न सही
इम्तिहां[२] और भी बाकी है, तो यह भी न सही

हैं वस्ल[३] हिज्र[४], आलमे-नमकीनो-ज़ब्त[५] में
माशूके-शोख़ ओ आशिके[६] दीवाना चाहिये

उन लब[७] से मिल ही जायगा बोसा[८] कभी तो, हां
शौके-फुजूल-और जुरअते-रिन्दाना[९] चाहिये

वो आके ख़्वाब में, तस्कीने-इज़्तिराब[१०] तो दें
वले मुझे तपिशे-दिल[११] मजाले-ख़्वाब [१२] तो दें

दिया है दिल अगर उसको, बशर[१३] है, क्या कहिये
हुआ रक़ीब[१४], तो हो, नामावर[१५] है, क्या कहिये

मुहब्बत में नहीं है फ़र्क़, जीने और मरनेका
उसी को देखकर जीते हैं, जिस काफ़िर पे दम निकले

## स्व-संबंधी

यह लाशे-बेकफ़न[१६] असदे-ख़स्ताजां[१७] की हैं
हक़ मग़फिरत[१८] करे, अजब आज़ाद मर्द था

---

१. समाधान. २. परीक्षा. ३. मीलन. ४. विरह. ५. जगाची मर्यादा व संयम ठेवून. ६. नखरेल प्रेयसी व प्रेमवेडा प्रियकर. ७. ओठ. ८. चुंबन. ९. आत्यंतिक शौक व स्वच्छंद धाडस. १०. व्याकुलतेचे सांत्वन. ११. मनाचा दाह. १२. झोपण्याचे धाडस. १३. माणूस. १४. प्रतिस्पर्धी. १५. दूत, पत्रवाहक जासूद. १६. कफनाशिवाय असलेले प्रेत. १७. विपद्ग्रस्त गालिब. १८. मुक्ती, मोक्ष.

ख़ामोशीमें निहां[1], ख़ंगूस्ता[2] लाखों आरजूएं हैं
चराग़े-मुर्दा[3] हूं मैं बेजुबां, गोरे-ग़रीबा[4] का

दोस्त ग़मख़्वारीमें मेरी सई फरमायेंगे क्या
जख़्म के भरने तलक, नाख़ून न बढ़ जायेंगे क्या

हज़रते-नासेह[5] गर आयें, दीद-ओ-दिल[6] फ़र्शे-राह[7]
कोई मुझको यह तो समझा दो, कि समझायेंगे क्या

तेरे वाहे पे जिये हम, तो यह जान, झूट जाना
कि खुशीसे मर न जाते, अगर एतिबार[8] होता।

ये मसाइले-तसव्वुफ,[9] यह तेरा बयान, 'ग़ालिब'
तुझे हम वली[10] समझते, जो न बादाख़्वार[11] होता

बंदगीमें[12] भी वो, आज़ाद-ओ-खुदबां[13] हैं, कि हम
उल्टे फिर आये, दरे-क़ाबा[14] अगर वा[15] न हुआ

हुई मुद्दत[16], कि 'ग़ालिब' मर गया, पर याद आता है
वो हर इक बात पर कहना, कि यूं होता, तो क्या होता

रेख़्ते[17] के तुम्ही नहीं उस्ताद हो, 'ग़ालिब'
कहतें हैं, अगले ज़माने में कोई 'मीर' भी था

---

१. लपलेल्या. २. अपूर्ण. ३. विझलेला दिवा. ४. गरीबाचे थडगे. ५. उपदेशक महाराज. ६. डोळे आणि हृदय. ७. वाटेवरचे अंथरलेले, पायघड्या. ८. विश्वास. ९. सूफी, गूढवादी तत्त्वज्ञान. १०. संत. ११. मद्य-प्रेमी. १२. दास्यत्व, बंधन. १३. स्वतंत्र व स्वाभिमानी. १४. काबा मशिदीचे दार. १५. उघडे. १६. पुष्कळ काळ. १७. उर्दू.

जिक्र उस परीवश[1] का, और फिर बयां[2] अपना
बन गया रक़ीब[3] आखिर, था जो राज़दां[4] अपना

मंज़र[5] इक बलन्दी[6] पर, और हम बना सकते
अर्श[7] से इधर होता, काश कि मकान अपना

हम कहां के दाना[8] थे, किस हुनर में यक्ना[9] थे
बे सबब हुआ 'ग़ालिब', दुश्मन आस्मां[10] अपना

पूछतें हैं वो, कि 'गालिब' कोन है
कोई बतलाओ, कि हम बतलायें क्या

शमा बुझती है तो उसमेंसे धुआं उठता है
शोल-ए-इश्क़[11] सियह-पोश[12] हुआ, मेरे बाद

कौन होता है हरीफे-मै-ए-मर्द[13] अफगने-इश्क़[14]
है मुकर्रर लबे-साक़ी[15] पे सला[16], मेरे बाद

कहते हैं, जब रही न मुझे ताक़ते-सुख़न[17]
जानूं किसी के दिल की मैं क्योंकर, कहे बिग़ैर

गर तुझको है यक़ीने-इजाबत[18] दुआ न मांग
यानी बिग़ैरे-यक दिले-बे-मुद्दआ[19], न मांग

---

१. अप्सरा-स्वरूप. २. वर्णन, सांगणे. ३. प्रतिस्पर्धी. ४. रहस्य जाणणारा, मित्र. ५. फिरण्याचे ठिकाण. ६. उंची. ७. आकाशातील सर्वोच्च स्थल; ईश्वरी उंची. ८. शहाणे, लायक. ९. अद्वितीय, प्रवीण. १०. आकाश, तारे. ११. प्रेमाची ज्वाला किंवा दीप. १२. काळा पोशाख. १३. मदिरा पिणाऱ्या मर्दांचा प्रतिस्पर्धी. १४. प्रेम-वीर. १५. साकीचे ओठ. १६. आवाहन, निमंत्रण. १७. बोलण्याची शक्ती. १८. प्रार्थना-स्वीकृतीचा विश्वास. १९. इच्छेविरहित हृदय, निरिच्छ मन.

आता है दाग़े-हसरते-दिल[1] का शुमार याद
मुझसे मेरे गुनाह का हिसाब, ऐ खुदा न मांग

लूं वाम[2] बख़्ते-खुफ्ता[3]से, यक ख़्वाबे-खुश,[4] वले[5]
'ग़ालिब', यह खौफ़[6] है, कि कहांसे अदा करूं

अपने पे कर रहा हूं क़ियास, अहले दह्र[7] का
समझा हूं दिलपज़ीर[8] मता-ए-हुनर[9] को मैं

या रब! ज़माना मुझको मिटाता है, किसलिये
लोहे-जहां पे[10] हर्फ़े-मुकर्रर[11] नहीं हूं मैं

दिल ही तो है, न संगो[12]-ख़िश्त[13], दर्दसे भर ना आये क्यों
रोयेंगे हजार बार, कोई हमें सताये क्यों

दैर[14] नहीं, हरम नहीं,[15] दर[16] नहीं, आस्तां[17] नहीं
बैठे हैं रहगुज़र[18] पे हम, कोई हमें उठाये क्यों

वां वो ग़ुरूर[19]-इज़्ज़ो-नाज़[20] यां यह हिजाबे[21]-पास[22]-वज़्औ[23]
राह में हम मिले कहां, बज़्म[24] में वो बुलायें क्यों

हम भी तस्लीम[25] की खूं[26] डालेंगे
बे-नियाज़ी[27] तेरी आदत ही सही

---

१. मनाच्या असंख्य अतृप्त इच्छा. २. उधार, उसने. ३. सुप्त भाग्य. ४. गोड स्वप्न. ५. परंतु. ६. भीती, दुःख. ७. जगातील लोक. ८. मने काबीज करणारा, दिलपसन्द. ९. कलावैभव. १०. जगाचा फलक. ११. दोनदा लिहिलेला शब्द. १२. दगड. १३. वीट. १४. मंदिर. १५. मशीद. १६. दार. १७. उंबरठा. १८. आमरस्ता. १९. गर्व. २०. इभ्रत व सौंदर्य. २१. संकोच, पडदा. २२. सांभाळणे, जपणे. २३. स्वाभिमान. २४. बैठक, मैफिल. २५. मान्य करणे. २६. सवय. २७. बेपर्वाई, अनास्था.

नसिय[1]-ओ-नक़्दे[2]-दो आलम की हक़ीक़त मालूम
ले लिया मुझसे, मेरी हिम्मते-आली[3] ने मुझे

तुमको भी हम दिखायें, कि मजनूं ने क्या किया
फ़ुर्सत कशाकशे[4]-ग़मे-पिन्हां[5] से गर मिले

हो चुकीं, 'ग़ालिब', बलायें[6] सब तमाम
एक मर्गे-नागहानी[7] और है

ज़िंदगी अपनी जब इस शकलसे गुज़री, 'ग़ालिब'
हम भी क्या याद करेंगे, कि खुदा रखते थे

रखता फिरूं हूं खिरक़[8]-ओ-सज्जादा[9] रहने[10]-मै[11]
मुद्दत हुई है, दावते-आबो-हवा[12] किये

होगा कोई ऐसा भी कि 'ग़ालिब' को न जाने
शायर तो वो अच्छा है, पर बदनाम बहुत है

## वसंत ऋतू

फिर इस अंदाज़से बहार आई
कि हुए मेहर[13]-ओ-मह[14] तमाशाई।

---

१. उधारी. २. नगद. ३. महान साहस, स्वाभिमान. ४. संघर्ष, झगडा. ५. आंतरिक दुःखाचा संघर्ष. ६. संकटे, आपदा. ७. आकस्मिक मरण. ८. फकिराची कथा. ९. नमाज पढण्याचे आसन. १०. गहाण. ११. मद्य. १२. वसंत ऋतूप्रीत्यर्थ मेजवानी वा मद्यपान. १३. चंद्र. १४. सूर्य.

देखो ऐ साकिनाने-खित्त ए-खाक[1]
इसको कहते हैं आलम आराई[2]

कि जमीं हो गई है सर-ता-सर[3]
रुकशे[4]-सतहे-चर्खे[5]-मीनाई[6]

सब्ज़े[7] को जब कहीं जगह न मिली
बन गया रु-ए-आब[8] पर काई[9]

सब्ज-ओ-गुल को देखनेके लिये
चश्मे[10]-नरगिस[11] को दी है बीनाई[12]

है हवा में शराब की तासीर[13]
बादा नोशी[14] है बाद पैमाई[15]

## मृत्युलेख

ऐ ताज़ा वारिदाने[16]-बिसाते-हवा-ए-दिल[17]
ज़िन्हार,[18] अगर तुम्हें हवसे-नाओ-नोश[19] है

देखो मुझे, जो दीद-ए-इबरत निगाह[20] हो
मेरी सुनो, जो गोशे[21]-नसीहत[22] नियोश[23] है

---

१. या धरतीवर राहणारे रहिवासी. २. सजावट, शृंगार. ३. या टोकापासून त्या टोकापर्यंत. ४. आरशाचा पृष्ठभाग, लाजवणारी. ५. आकाश. ६. सुरईच्या आकाराचे. ७. हिरवळ. ८. पाण्याचा पृष्ठभाग. ९. शेवाळ. १०. डोळे. ११. नरगिसचे फूल. १२. दृष्टी. १३. प्रभाव. १४. मद्यपान. १५. व्यर्थ. १६. नवागत. १७. मनोवासनांचे क्षेत्र. १८. सावधान. १९. गाणे व दारू यांचा शौक किंवा आकांक्षा. २०. दुसऱ्यापासून बोध घेणारी दृष्टी. २१. कान. २२. सदुपदेश. २३. ऐकणारे.

साक़ी, बजल्वा दुश्मने-इमानो-आगही[१]
मुतरिब[२] बनग्मां, रहजने[३]-तमकीनो-होश[४] है

या शब्र को देखते थे, कि हर गोश-ए-बिसात[५]
दामाने[६]-बाग़बानो-कफे[७]-गुलफरोश[८] है

लुत्फे-खिरामे[९]-साकी-ओ-ज़ौक़े-सदा[१०]-ए-चंग[११]
यह जन्नते-निगाह[१२], वो फिरदोसे-गोश[१३] है

या सुब्ह दम जो देखिये आकर, तो बज़्ममें
न वो सुरुरो-सोज़[१४], न जोशो-खरोश[१५] है

दाग़े-फिराक़े[१६]-सोहबते[१७]-शब[१८] की जली हुई
इक शम्अ रह गई है, सो वो भी खामोश है

आते हैं ग़ैब[१९] से, ये मज़ामीं खयाल[२०] में
'ग़ालिब', सरारे-खामा[२१] नवा-ए-सरोश[२२] है

## विविध

देखना तक़रीर[२३] की लज्जत, कि जो उसने कहा
मैंने यह जाना, कि गोया यह भी मेरे दिल में है

---

१. धर्म व ज्ञानाची शत्रू. २. गाणारीण. ३. चोर, लुटारू. ४. प्रतिष्ठा व बुद्धी. ५. जमिनीवरील कोपरा. ६. अंचल, पदर. ७. हात, ओंजळ. ८. फुलमाळी. ९. मंथर गती. १०. आवाज. ११. एक प्रकारचे वलिवाद्य (अकॉर्डियन). १२. दृष्टीचा स्वर्ग. १३. कानांचा स्वर्ग. १४. आनंद व ऊब. १५. उत्साह, जोश. १६. विरह. १७. मैफिल किंवा सोबत. १८. रात्र. १९. अदृश्य किंवा काल्पनिक लोक. २०. या कल्पना. २१. लेखणीचा सरसर वा कुरकुर आवाज. २२. देवदूताचे स्वर. २३. भाषण, संभाषण.

साक़ीगरी की शर्म करो आज, वरना हम
हर शब[1] पिया ही करतें हैं मै, जिस क़दर मिले

तुझसे तो कुछ कलाम[2] नहीं, लेकिन ऐ नदीम[3]
मेरा तो सलाम कहियो, अगर नामावर[4] मिले

लाज़िमु[5] नहीं, कि खिज्र[6] की हम पैरवी[7] करें
जाना कि एक बुज़ुर्ग हमें हमसफर[8] मिले

जुल्मत कदे[9] में मेरे, शबे-ग़म[10] का जोश है
इक शम्अ है दलीले-सहर[11], सो खामोश है

और बाज़ारसे ले आये, अगर टूट गया
सागरे-जम[12] से मेरा जामे-सिफाल[13] अच्छा है

पुर हूं[14] मैं शिकवेसे[15] यों राग से जैसे बाजा
इक जरा छेड़िये फिर देखिये, क्या होता है

जिस जख्म की हो सकती हो तदबीर, रफू[16] की
लिख दीजिये, या रब, उसे क़िस्मतमें अदू[17] की

मुनहसिर[18] मरने पे हो, जिसकी उमीद
नाउमीदी[19] उसकी, देखा चाहिये

---

१. रात्र. २. बोलणे. ३. मित्र, साथी. ४. जासूद, पत्रवाहक. ५. आवश्यक. ६. खिज्र = पैगंबराचेच एक नाव; उर्दू-फारशी काव्यातील परमेश्वरी वाटाड्या. हा चिरंजीव आहे असे मानतात. ७. अनुसरणे. ८. सहप्रवासी. ९. अंधारी कैद. १०. दुःखाची रात्र. ११. सकाळ होण्याचे प्रमाण. १२. इराणचा बादशहा जमशेद याचा प्याला. १३. मातीचे मधुपात्र. १४. भरलेला. १५. गाऱ्हाणी, तक्रारी. १६. रफू, टाके. १७. शत्रू. १८. अवलंबून. १९. निराशा.

यह ज़िद, कि आज न आये, और आये बिन न रहे
क़ज़ा[1] से शिकवा हमें किस क़दर है, क्या कहिये

यह फितना[2], आदमी की ख़ाना-वीरानी[3] को क्या कम है
हुए तुम दोस्त जिसके, दुश्मन उसका आसमां क्यों हो

शर[4]-ओ-आईन[5] पर मदार सही
ऐसे क़ातिल[6] का क्या कर कोई

बात पर वां ज़बान कटती है
वो कहें और सुना करे कोई

कहां मैख़ाने[7] का दरवाज़ा, ग़ालिब, और कहां वाइज़[8]
पर इतना जानते हैं, कल वो आता था, कि हम निकले

'ग़ालिब', बुरा न मान, जो वाइज़ बुरा कहे
ऐसा भी कोई है, कि सब अच्छा कहें जिसे

कहते हुए साकी से हया[9] आती है, वरना
है यों कि मुझे दुर्दे-तहे-जाम[10] बहुत है

मुझको दयारे-ग़ैर[11] में मारा, वतन से दूर
रखली मेरे ख़ुदाने, मेरे बेकसी[12] की शर्म

१. मृत्यू. २. खोडी, चेष्टा. ३. घर उध्वस्त करणे. ४. कायदेकानू. ५. नियम. ६. गुन्हेगार, खुनी. ७. मदिरालय. ८. धर्मोपदेशक, प्रचारक. ९. लाज, संकोच. १०. मदिरापात्राच्या तळाशी उरलेली दारू. ११. परका मुलूख, विदेश. १२. असहायता.

# 'भारत – देश आणि लोक' ग्रंथमाला

## प्रसिद्ध झालेले ग्रंथ

| | | |
|---|---|---|
| १. फुलझाडे | —डॉ. एस. एम. रंधावा | ६·७५ |
| २. भारताची खनिजे | —श्रीमती मेहेर डी. एन. वाडिया | ५·०० |
| ३. उद्यान पुष्पे | —डॉ. विष्णु स्वरूप | ७·५० |
| ४. निकोबार बेटे | —श्री कौशलकुमार माथुर | ५·५० |
| ५. भारतीय सर्प | —डॉ. पी. जे. देवरस | ६·५० |
| ६. परिचित वृक्ष | —डॉ. एच. संतापाऊ | ५·५० |
| ७. पाळीव प्राणी | —श्री हरबन्स सिंग | ४·७५ |
| ८. जमीन आणि माती | —डॉ. एस. पी. रायचौधरी | ५·२५ |
| ९. भारतीय पक्षी | —डॉ. सलीमअली व लईक फतेहअली | ९·०० |
| १०. लोकसंख्या | —एस. एन. अग्रवाल | ३·७५ |
| ११. भारताचा आर्थिक भूगोल | —व्ही. एस. गणनाथन | ५·५० |
| १२. उत्तर भारतातील मंदिरे | —कृष्णदेव | ४·०० |
| १३. भाजीपाला | —डॉ. बी. चौधरी | ६·५० |

# 'राष्ट्रीय चरित्रमाला'

## प्रसिद्ध झालेले ग्रंथ

| | | |
|---|---|---|
| १. गुरुनानक | —डॉ. गोपालसिंग | २·२५ |
| २. कबीर | —डॉ. पारसनाथ तिवारी | २·५० |
| ३. पं. विष्णु दिगंबर पलुस्कर | —व्ही. आर. आठवले | १·२५ |
| ४. पं. विष्णु नारायण भातखंडे | —एस. एन. रातंजनकर | १·२५ |
| ५. महाराणा प्रताप | —श्री राजेन्द्र शंकर भट्ट | २·५० |
| ६. हर्ष | —श्री व्ही. डी. गांगल | २·५० |
| ७. त्यागराज | —प्रा. पी. सांबमूर्ती | २·०० |
| ८. समुद्रगुप्त | —श्री ललनजी गोपाल | २·२५ |
| ९. गुरु गोविंदसिंग | —डॉ. गोपालसिंग | ३·२५ |
| १०. अहिल्याबाई | —श्री हिरालाल शर्मा | २·७५ |
| ११. चन्द्रगुप्त मौर्य | —डॉ. ललनजी गोपाल | २·२५ |
| १२. रा. गो. भांडारकर | —श्री एच. ए. फडके | २·५० |
| १३. ईश्वरचन्द्र विद्यासागर | —श्री एस. के. बोस | २·०० |